# अस्पृश्य-विचार.



लेखक

श्रीपाद् महादेव माटे, एम्. ए.

प्रकाशक

सदाशिव कृष्णराव शिंदकर,

सेक्रेटरी, वाङ्मय-विहार-मंडळ,

२४८ सदाशिव पेठ, पुणें.

मुद्रक,

अनंत सखाराम गोखले,

'विजय' प्रेस, ५७० शनवार पेठ, पुणे.

सन १९२२.

किंमत १० आणे.

# प्रस्तावना.

अस्पृश्यांसंबंधानें ‘ केसरी ’ पत्रांत मीं जे लेख लिहिले ते, थोडी अदलाबदल करून व भर घालून, पुस्तक रूपानें प्रसिद्ध करीत आहें.

गेलीं चार पांच वर्षें अस्पृश्यांच्या प्रत्यक्ष परिचयानें त्यांच्या एकंदर स्थितीचें जे अवलोकन करतां आलें त्यावरून सुचलेले हे विचार आहेत. मी जुना शास्त्रीपंडितही नव्हे आणि नवीन पद्धतीचा समाजशास्त्रज्ञही नव्हे. अर्थात् माझ्या लिहिण्यांत विद्वत्ता कमी. पण येवढें मात्र वाटतें कीं, प्रस्तुत विषयाशीं माझी कांहींशी ओळख आहे. तिच्या बळावर अस्पृश्यांचें गाऱ्हाणें समाजाला सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

विद्वान् लोक आणि राष्ट्रहिताचे साधक यांनीं हा निबंध वाचून कांहीं अनुकूल–प्रतिकूल लिहिलें तर या बाबतींत जें कांहीं पुढें कर्तव्य असेल त्याचें स्वरूप जास्त निश्चित व कमी विवाद्य होईल.

२३६ सदाशिव पेठ,
पुणें शहर.

श्री. म. माटे.

# अस्पृश्यविचार.

गेल्या दोन वर्षांत अस्पृश्यतेच्या प्रश्नाला जोरानें उचल मिळाली आहे. राष्ट्रीय सभेनें त्याचा पुरस्कार केल्यामुळेंच ही गोष्ट घडून आली हें उघड आहे. सर्व हिंदुस्थानचें लक्ष आपल्या कारभाराकडे हटकून ओढून घेणारी अशी ही संस्था असल्यामुळें तिच्या द्वारा ज्या विषयाचा पुकारा झाला त्याला महत्त्व चढावें हें साहजिक आहे. ज्या भाकरीचा पेंच षट्शास्त्र्यापासून तों महारापर्यंत सर्वांनाच पडला आहे त्या भाकरीचा प्रश्न सोडविण्याचें काम राष्ट्रीय सभा करीत असल्यामुळें सर्वसामान्य जनसमूहाचा ओढा अर्थातच राजकारणाकडे आहे, आणि त्या राजकारणाचा विचार करीत असतांना त्याच्या यशासाठीं ज्या ज्या इतर गोष्टींचा विचार करणें अवश्य आहेसें दिसेल त्यांचा निदान विचार करण्यास लोक पुष्कळदां मनाच्या विरुद्धसुद्धां कबूल होतील. आजपर्यंत सामाजिक परिषदा काय थोड्या भरल्या? अस्पृश्यतेसंबंधीं चर्चा, भाषणें, ठराव, निषेध इत्यादि प्रकार त्या सभांतून काय थोडे झाले? पण त्यांच्याकडे बहुजनसमाजानें फारसें लक्ष दिलें नाहीं. त्यांच्या पसंतीची जी राष्ट्रीय सभा तिनें या प्रश्नाचा प्रामुख्यानें उल्लेख करतांच सगळीकडे एतद्विषयक हालचाल चालू झाली. असें जरी आहे तरी या हालचालीचें सर्व श्रेय काँग्रेसला अर्पण करणें हें युक्त होणार नाहीं. महात्मा गांधींनीं या विषयासंबंधानें आपल्या भाषणांतून व लेखांतून स्पष्ट व निर्भीड चर्चा केल्यापासून इकडे लोकांचें

लक्ष जास्त वेधलें आहे. जो गृहस्थ आपल्याला पसंत व जरूर त्या राजकारणाविषयीं इतकें बोलतो व करतो तोच अस्पृश्यतेसंबंधानेंही सांगूं लागला म्हणजे त्याचें म्हणणें खरें आहे असें वाटूं लागावें, त्या विषयाला कांहीं जातिवंत व स्वयंभू महत्त्व आहेसें पटावें व निदान स्थानमाहात्म्य म्हणून, सभागौरवासाठीं म्हणून, मुग्ध नापसंतीनें ताठरलेली आपली मान बहुजनसमाजानें अलंकारिक रीत्या पसंति दाखविण्यासाठीं डोलवावी हें बरोबर आहे. पसंत असो कीं नसो, कॉंग्रेस व गांधी यांनीं हा विषय गळीं बांधला हें खरें. आतां तो गळीं उतरावयाचा राहिला आहे. एकाद्या मोठ्या थोरल्या लोकप्रिय कंपनीनें आपल्या आजपर्यंतच्या तपाचा फायदा घेऊन, अगर भावी यशाकडे व स्वार्थाकडे लक्ष देऊन, साधारणतः अप्रिय मजकुराचें चोपडें प्रसिद्ध केल्यानें त्या चोपड्याला प्रसार, प्रसिद्धि आणि आदर हीं जशीं आपोआपच प्राप्त होतात तसाच कांहींसा प्रकार राष्ट्रीय सभेनें अस्पृश्यतेच्या केलेल्या पुकाऱ्यांत झालेला आहे. तिच्या बोजामुळें लोकांनीं आदरभावानें ऐकलें व राजकारण हा जो तिचा पेशा त्यांत तेढ पडतां उपयोगी नाहीं अशा धोरणानें तिनें सदुपदेश केला. महात्मा गांधी यांनीं मात्र राजकारणापेक्षांहि आपल्याला उंच वाटणाऱ्या धर्मबुद्धीनें प्रेरित होऊन या विषयाला उचल दिली.

पण कॉंग्रेसनें व गांधींनीं हा पुरस्कार करावयाच्या आधीं आमच्या समाजाचें मन काय अगदीं स्वस्थच बसलें होतें ? आमची प्रचंड लोकसंख्या ही कांहीं कांहीं प्रसंगीं मोठी गैरसोयीची आहे असें वाटूं लागतें. कारण आपत्तिनिवारणाच्या कामीं एवढा मोठा डोंगर मानमोड करणारा वाटतो. पण तोच लोकसंख्येचा अफाटपणा उपययोजनेच्या, चिंतनाच्या आणि अंमलबजावणीच्या कामीं-असंख्य मनांच्या असंख्य ठेवणीमुळें व सामर्थ्यामुळें कार्यांत सुकरता

उत्पन्न करतो, असो. बहुजनसमाज जरी या बाबतींत उदासीन आणि विरुद्ध असला तरी या अजाणिवेच्या निशेंत समाज निजलेला असतांना कोणी कोणी विचारसंयमीं जागे राहिले होते; आणि मधून मधून आपल्या जागेपणाची आणि रात्रीच्या अमलाची ख़ूण त्यांनीं झोंपमोडीबद्दल होणारी अप्रियता संपादूनसुद्धां समाजाला दिली होती. ज्या वेळीं समाज पाहत नाहीं, त्या वेळीं जो पाहतो, तोच पाहतो. अशा पाहणारांची संख्या कमी होती म्हणूनच सामाजिक परिषदेच्या ठरावाकडे कोणी फारसें लक्ष देत नसे. पण कमी असो कीं जास्त असो, या लोकांच्या कर्तबगारीमुळें कॉंग्रेसला हा विषय पत्करावा लागला असें म्हटल्यास त्यांच्या कर्तबगारीच्या वर्णनापेक्षां आपण कांहीं जास्त केलें असें होत नाहीं. समाजानें आपली केलेली हेटाळणी, प्रतिकूल परिस्थितीमुळें वारंवार होणारा कोंडमारा, स्वतःच्या सद्धेतूसंबंधानें उत्पन्न झालेलीं अगर उपस्थित केलेलीं विपरीत मतें या सर्व गोष्टी मावळून जाऊन, आपल्याला ज्याची अत्यंत आस्था तो विषय सर्वसाधारण जनसमूहाच्यासुद्धां आदरयुक्त विचाराला पात्र झाला हें पाहून आपलें सुभाषित आपल्याच अंगीं जीर्ण होईल कीं काय अशी आजपर्यंत भीति बाळगणारा सुधारकवर्ग खरोखर प्रमुदित झाला असेल यांत शंका नाहीं. पुढील राजकारणी अवतरले म्हणजे मागचे मागें पडून, त्यांनीं अडविलेली लोकांच्या मनांतील जागा पुढिलांच्यासाठीं रिकामी व्हावी, नवा सुधारक आला म्हणजे त्याच्या तेजांत मागला लपावा हा सृष्टीचा क्रमच आहे. पण सामान्य माणसाची दृष्टि जरी याप्रमाणें नित्य नवीन येणाऱ्या फिल्मवर चिकटलेली असली तरी एकाद्या वस्तूची वाढ निरीक्षावयास शिकलेल्या जागरूक डोळसाला हें स्पष्ट दिसतें कीं, हा एक तऱ्हेचा श्रमविभाग चाललेला आहे. एकाद्या तत्त्वाच्या अगर मताच्या पूर्ण उत्कर्षाला शंभर वर्षांचा किंमत पड-

णार असेल, तर जसजसा मतपोष होईल तसतसा पुढाऱ्यांच्या तेजस्वितेचा उदय दिसूं लागतो. पण वास्तविक ते मागल्यांच्या खांद्यावर उभे असल्यामुळेंच त्यांच्यापेक्षां उंच दिसतात. ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे पूर्वी ज्या ज्या माणसांनीं या प्रश्नासंबंधानें प्रयत्न केलेले असतील त्यांची योग्यता पुरतेपणीं कळेल व त्यांचा गौरव करण्याची बुद्धि जागी राहील असो, तर या विषयाच्या उचलीला कॉंग्रेस, गांधी व सुधारक यांनीं जो हातभार लावला त्याविषयीं किंचिन्मात्र उल्लेख केल्यानंतर परिस्थितीच्या सपाट्याचाही उल्लेख करणें जरूर आहे.

परिस्थितीचा वारा अस्पृश्यांना अनुकूल असा फिरूं लागला. जर्मन युद्धापासून हरतऱ्हेचे बोध मनुष्य—योनीला मिळाले. स्वतःच्या हितासाठींच वास्तविक ज्यांनीं युद्धें आरंभिलीं त्यांनीं तीं अनाथांकरतां व दुबळ्यांकरतां आहेत असा गवगवा केला. कारण लोकांची सहानुभूति मिळवून आपलीं मर्में लपवावयाचीं होतीं. त्या सहानुभूतीच्या बळावर व धडधडीत खोट्या भुलथापांवर लढाई तर मारली. संकटाच्या प्रसंगीं सर्व सामर्थ्यें एकवटावीं म्हणून नेहमीं असत्यानें लडबडलेली जीभ सत्यें व उदात्त तत्वें बोलूं लागली. सत्यानें आणि उदात्त तत्वांनीं शरण आलेल्यांना आश्रय देऊन संकटमुक्त केलें. पण मदतीला बोलावून आणलेला राजा जसा घरांतच तळ देऊन आपल्याला हवी तशी व्यवस्था करूं लागतो त्याप्रमाणें त्यांनीं या मतलबखोरांच्या घरादारांची व वेलविस्ताराची व्यवस्था आपल्याकडे घेतली. स्वतंत्रता, न्याय, स्वयंनिर्णय इत्यादींना लबाडीनें घरीं बोलावून आणिलें. पण या निष्ठुर तत्त्वांनीं फसव्या लोकांवर विलक्षण सूड उगविला, त्यांच्या खुद्द घरीं आणि त्यांनीं बाहेर मांडलेल्या संसारांत आपलाच घुमारा सुरू केला. ‘ आमच्या राज्यावर सूर्य कधीं मावळत नाहीं ’ या गर्वोक्ति बाधक होतीलसें

झालें. कारण इतक्या विस्तृत भूपृष्ठावर उदात्त तत्त्वांचा बोलबाला लगोलग सुरू झाला. आतां दो–दो हातांनीं ‘ दादा, जरा दमानें घ्या ’ म्हणावें लागत आहे. कळकाचें कुडण तेंच हयगयखोराचें सरण अशी स्थिति झाली. ही उदात्त तत्त्वांच्या प्रवेशाची आणि प्रसाराची गोष्ट अवघ्या मानव्याच्या हिताची झाली. जो तो न्यायाचा उच्चार करूं लागला. आपण कोण आहों हें ध्यानांत भरल्यामुळें जो तो स्वयंनिर्णय करूं लागला. सातासमुद्रापलीकडे माजलेल्या कलीला धर्मदंडाशीं पुनः करकंडून बांधण्यासाठीं व मनुष्ययोनि सुखी करण्यासाठीं पृथ्वीवरील अवघ्या लोकांना आग्रहानें आमंत्रणें करणाऱ्यांना मोठा जाच सुरू झाला. “ अहो स्वतंत्रतावाले इंग्रज, काढा स्वयंनिर्णय कोठें आहे तो ” असें हिंदी लोक म्हणूं लागले. पण कवलाघरावर उभे राहून ‘न्याय न्याय’ म्हणून ओरडणाऱ्या हिंदी प्रजेच्या शद्बांचा प्रतिध्वनि इंग्लंडकडून येण्याच्या आधींच थेट इटनाक महार, पिरा मांग आणि परशा चांभार यांच्या घरांतून उठूं लागला; त्यांचीं खोपटीं, रकटीं बोलूं लागलीं आणि अशा रीतीनें ऑस्ट्रियन राजपुत्राचा खून अस्पृश्यांच्या पथ्यावर पडला.

असो. वरील सर्व लिहिणें जरी मानलें तरी या प्रश्नाच्या उलटसुलट बाजू पाहणें; राजकारण, धर्मकारण, तारतम्य, देवधेव इ. दृष्टींनीं त्यांचा पूर्ण विचार करणें अवश्य आहे. निरनिराळीं मतमतांतरें आपल्या गलबल्यासह पुढें आल्यामुळें निवड करणें पुष्कळदां फार कठीण होऊन बसतें, व विषयाचा अभ्यास दूर राहून परस्परांविषयींचे गैरसमज व दुराग्रह मात्र वाढीस लागतात. असें न व्हावें म्हणून पुढील लेख लिहिला आहे. त्यांतील विधानांचा आस्थेवाईक विचार करावा अशी वाचकांना नम्र विनंति आहे.

अस्पृश्यांच्या एकंदर स्थितीचा विचार करून त्यांच्या तक्रारीला एकच नांव द्यावयाचें म्हटलें तर तें अस्पृश्यता हें होय. सुशिक्षित महारांनीं आपल्या स्थितीचें ठळक निदर्शन स्वतःला 'बहिष्कृत' हेंच विशेषण लावून केलें आहे. तेव्हां त्याच्या दृष्टीनेंहि बहिष्कार अगर अस्पृश्यता हेंच त्याच्या तक्रारीचें मुख्य नांव आहे. जन्मानेंच कमी समजलें जाणें इत्यादि दुसऱ्या कांहीं बाबींत, इतर ब्राह्मणेतरां-बरोबरच ब्राह्मणांविरुद्ध भांडावयास त्यांना एक विस्तृत अधिष्ठान सांपडतेंच, पण त्याच्या जोडीला अधिक जिकीरीचें व केवळ त्यांनाच लागू असें 'अस्पृश्यता' नांवाचें एक निराळें अधिष्ठान आहे. प्रस्तुत लेखांत या उभयतांविषयींची चर्चा व्हावयाची आहे. पण या स्वतंत्र अधिष्ठानाचेंच महत्त्व जास्त आहे हें उघड आहे. अस्पृश्यतेसंबंधीं लिहावयास लागण्याच्यापूर्वी-म्हणजे तिच्यामुळें आपलें राजकारण, समाजकारण इत्यादींवर काय काय विपरीत परिणाम होत आहेत, खुद्द अस्पृश्यांना तिच्यामुळें कसकसे हाल सोसावे लागत आहेत, व शेवटीं तिच्या निवारणासाठीं उपाय-योजना कसकशी करावी इत्यादि गोष्टींचा ऊहापोह करावयाच्या-पूर्वी—अस्पृश्यतेच्या अस्तित्वाविषयीं दोन शब्द लिहिणें जरूर आहे. कोणी असें म्हणेल कीं, अस्पृश्यतेच्या अस्तित्वासंबंधीं शंका आहे कोणाला? जी गोष्ट धडधडीत दिसत आहे ती सिद्ध करण्याची खटपट कशाला? तर अशा वाचकांना इतकेंच कळवावयाचें आहे कीं, आपण स्वतःवरून जग ओळखण्याचें सौजन्य दाखवीत आहां. खेडेगांवांत आणि जुन्या मगरमिठ्या अगदीं गच्च राहिलेल्या शहरच्या भागांत जरा हिंडून पाहावें. विषयाचा प्रस्ताव करून देऊन जुन्याचे अभिमानी वावदूक कसे तडकाफडकी निकाल देत आहेत हें बाजूला उभें राहून ऐकावें म्हणजे वरील खटपट करणें जरूर आहेसें वाटूं लागेल. वादविवाद

केला असतांना व कोटिक्रमाचे कैचींत आपण होऊन उतरलों असतांना एकादी अप्रिय गोष्ट कबूल करण्याची आपत्ति उत्पन्न होण्यासारखी आहे असें दिसत असलें तर वादाला तोंडच लागूं नये म्हणून तिचें अस्तित्वच मुळीं नाकबूल करणें हा मोठा हटकून लागू पडणारा डाव असतो; आणि चमत्कार हा कीं, अगदीं अडाणी माणसाला सुद्धां हा डाव करण्याचें स्थळ कोणतें हें तर्काचे त्रिळखे माहीत नसतांना सुद्धां कळतें म्हणून अशाच्या सोयीसाठीं ही खटपट पाहिजे, नाहीं तर " फिर्यादीचा हांडा आम्ही आणलाच नाहीं " हा वकीलसाहेबांचा कोटिक्रम निरुत्तर समजला जावयाचा ! सामाजिक बहिष्कार या लोकांना नाहीं म्हणावें तर ते आमच्या आजूबाजूला कोठें दिसत नाहींत हें कसें ? सभागृहांत इतर अप्रबुद्ध श्रोत्यांबरोबर हे कसे ऐकत बसत नाहींत ? नदीच्या पाणवठ्यावर व विहिरीबावडीवर शेजारधर्मांत घेतलेला मुसलमान दिसतो, मग हा अस्पृश्य दिसत नाहीं हें कसें ? मंडईमध्यें संत्रींनारिंगें विकावयास लांकडी सिंहासनावर अधिष्ठित झालेला अस्पृश्य अगदींच कसा दिसत नाहीं ? शाळेंतल्या क्रामिक पुस्तकांत जणुं काय जातीजातींचें वाङ्मयी संमेलन करण्यासाठीं ' यमुनामैना ' च्या जोडीला ' फति-मामारिअम ' चे धडे त्रिलगून लिहिलेले दिसतात, त्यांत जाधवाचा दलपतहि असतो, मग महाराचा मुलगा दिसत नाहीं हें कसें ? दक्षिणमहाराष्ट्रांतील एका प्रसिद्ध देवळाच्या सभामंडपाशेजारच्या हौदावर आपला मुसलमानबंधुसुद्धां चुळा भरतांना दिसतो; पण महार दहा हातांवर उभा राहतो हें कशाचें लक्षण ? धेड मामलेदार कोणीं ऐकला आहे ? महार सावकाराकडे कर्ज काढावयास कोणी गेला आहे ? त्यांचीं प्रत्यक्ष अद्वैतविचारांनीं मिष्ट झालेलीं गीतें द्वैत विसरून कोणी ऐकलीं आहेत ? आणि इतकें आहे तरी ' अस्पृश्यता आहे कोठें ?' असें नकारात्मक उत्तराच्या अपेक्षेनें विचारण्यांत येतें तें येतेच.

असे प्रश्न विचारले कीं, अहो! याला कारणें आहेत, असा जबाब लगोलग यावयाचा पण त्यावर प्रत्युत्तर इतकेंच कीं, त्या कारणांनांही उत्तरें करतां येण्यासारखीं आहेत, पण प्रस्तुत प्रश्न जो आहे तो हा कीं, अस्पृश्यता अगर बहिष्कार आहे कीं नाहीं? आणि तो आहे असें वरील प्रश्नांनीं सिद्ध होतें. दुसरें असें कीं, ' बहिष्कार नाहीं ' असें तुम्ही म्हणून काय होणार? महार काय म्हणतो? त्याची जबानी तुमच्या विधानाच्या विरुद्ध आहे. तो म्हणतो कीं, सिनेमाच्या पडद्यावर उठविलेलीं मनुष्याच्या विविध चारित्र्याचीं चित्रें जशीं अंधारांत बसून माणसें पाहतात तसे आम्ही दूर उभे राहून तुम्ही लोक काय वांकुल्या करीत असाल त्या अज्ञानानें पहातों यापेक्षां तुमचा आमचा विशेष संबंध काय? या बाबतींत त्यांची जबानी थोडी तरी ध्यानांत घेतलीच पाहिजे. एकंदर सामाजिक जिण्यामध्यें आपला हिस्सा किती आहे हें ज्याच्या वांटणीला तो हिस्सा पडलेला असतो त्याच्याइतकें चांगलें दुसऱ्या कोणाला कळणार? साहेब म्हणतो, मी तुला स्वराज्याचा मलिदा कितीतरी चारीत आहे. पण भुकेनें व्याकुळ झालेला देशभक्त म्हणतो, या तुझ्या ' कितीतरी ' मलिद्यानें माझें दाढवणहि माखत नाहीं! तेव्हां स्वराज्याचे हक्क किती मिळाले हें जसें हिंदी देशभक्ताला विचारून ठरवावें हें युक्त, तसेंच हिंदू समाजाच्या संसारांत आपला भाग काय हें महाराला विचारून ठरवावें; म्हणजे चुकीचा संभव कमी. ' मी बहिष्कृत आहें ' असें जर महार म्हणत असेल तर त्याच्या बोलण्यांत सत्यांश आहे हें गृहीत धरावयास हरकत नाहीं. शिवाय या लोकांना बहिष्कार नाहीं असें म्हणणारांना एक वेंचक प्रश्न करतां येण्यासारखा आहे. आपल्या लोकप्रिय पुढाऱ्यांवर कशी एक वेडगळ आपत्ति हे लोक आणतात पाहा! अस्पृश्यता जर नसेल तर ' अस्पृश्यता काढलीच पाहिजे ' असें जें

कै. लोकमान्यांनीं हडसूनखडसून सांगितलें होतें व महात्मा गांधी त्रागा करूनसुद्धां सांगतात याचा अर्थ काय ? जें अस्तित्वांतच नाहीं तें काढावयास सांगणें हा शुद्ध वेडगळपणा आहे ! आणि असला वेड-गळपणा अशा थोर पुरुषांच्या पदरीं बांधण्याचें धाडस आपण कां करावें ? सांगावयाचें तात्पर्य इतकेंच कीं, प्रश्न डावलण्यांत मौज नाहीं. ' हुं ' म्हटल्यानं जशी आंगठी निघत नाहीं तसें ' नाहीं ' म्हटल्यानें असलेला प्रश्न नसलेला होत नाहीं. खरा देशाभिमान व शूरपणा एकाद्या प्रश्नाकडे अचल टक लावून पाहण्यांत व त्याचे उंचसखल भाग लक्षांत भरले म्हणजे तो निकालांत काढण्यासाठीं झटत राहण्यांत आहे हें एकमेकांना सांगण्याची काय जरूर आहे ? असो. तर या प्रश्नाच्या सोडवणुकीस लागावें इतकेंच सांगावयाचा मतलब आहे.

पण सदर प्रश्नाला प्रवृत्तीनें व संस्कृतीनें जे लोक विन्मुख अस-तात ते युक्तिवाद पटला तरी झटण्याची भाषा सुरू झाली कीं, पुनः मान मुरगळून उरफाटे होणार ते होणारच व आपली मूळची नापसंति व्यक्त करणार. कांहीं खटपट करावी असें म्हटलें कीं " होतेंच आहे, चाललेंच आहे, हलकें हलकें कालानुरूप होतेंच आहे " असें पुढील उत्तर आहे ! हें उत्तर मात्र निराशा उत्पन्न करतें. काळ इष्ट तो फरक घडवून आणील हें तर खरेंच कारण तुम्ही गप्प बसलांत तरी दुसऱ्याच्या अंगांत संचरून जरूर ती घटना तो करील आणि कालाला म्हणजे खटपट करणाऱ्या नैतिक मगदुराला जशी साधेल तशी ती होईल. तुम्हांला पाहिजे तशी होणार नाहीं. एवढ्यासाठीं त्या प्रश्नांत आपलेपणाचा ओलावा उत्पन्न करून घेतला पाहिजे. सबंध हिंदू समाजाचें भवितव्य लक्षांत घेऊन जबाबदारीनें खटपट केली पाहिजे; नाहीं तर त्याच्या म्हणजे, परंपरेनें हिंदी राष्ट्राच्या, चिरफळया करण्यांत ज्यांचें हित

आहे ते स्वतःच्या वैभवाची जपणूक करण्यांत कर्मशूर असल्यामुळें काल त्यांना वश होऊन जिवंत ठेवील व आम्हांला प्रतिकूल होऊनच ठार मारील !

दुसऱ्याही एका बारीक मुद्याचा जातां जातां विचार करणें जरूर आहे. या अस्पृश्यतेचें स्वरूप आणि तिचे परिणाम लक्षांत घेतले पाहिजेत. निरनिराळ्या शिवता-शिवतींची भेसळ होऊं देतां उपयोगी नाहीं. अस्पृश्येतर लोकांचे परस्पर संबंध पाहतां त्यांच्यांतहि मंद मंद छटा टाकणारी अस्पृश्यता असते असें दिसेल. हे लोक एकमेकांना शिवतात, पण त्यांचे घरगुती आणि वैयक्तिक व्यवहार प्राप्त झाले म्हणजे एकमेकांपासून दूर सरतात. आहाराच्या तीव्र भेदामुळें ही बारीक आणि पातळ स्वरूपाची अस्पृश्यता सर्व म्हणजे अस्पृश्येतर लोकांत आढळून येते. आहारविहाराची शुचिता जों जों जास्त तों तों इतरांपासून अलग राहण्याची प्रवृत्ति जास्त. पण या असल्या अस्पृश्यतेची महाराच्या देहाला चिकटलेल्या अस्पृश्यतेशीं गल्लत करतां कामा नये. ही अस्पृश्यता ऐहिक वैभवसंपादनाच्या आड येत नाहीं. मी या ठिकाणीं कर्माच्या वांटणीसंबंधानें बोलत नसून फक्त ‘ विटाळा ’ संबंधानें बोलत आहे हें ध्यानांत ठेवावें. तिच्यामुळें कोणाच्या सार्वजनिक चारित्र्याला आळा बसला आहे असें नाहीं. प्रस्तुत ठिकाणीं मात्र माणसांत येण्याचीच चोरी म्हणजे बंदी असा अस्पृश्यतेचा परिणाम झाला आहे. तर अशा या रूढींचा ऱ्हास होणें जरूर आहे. आतां वर एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें या रूढीचा उच्छेद करणें कां जरूर आहे याचा विचार करावयास लागूं.

राजकारण हा आपणा सर्वांचा आवडता विषय आहे म्हणून त्याचाच थोडासा विचार प्रथम करावा हें योग्य होईल. पहिली अगदीं ढळढळीत गोष्ट म्हणजे ही कीं, आम्ही जोंपर्यंत त्यांना

स्पर्शयोग्यसुद्धां समजत नाहीं तोंपर्यंत या लोकांत स्वदेशाभिमान उत्पन्न होणें अशक्य आहे. अभिमान कशासाठीं बाळगावयाचा ? आणि कोणाचा बाळगावयाचा? तुमच्या देशाचा ? तुमच्या देशाचा अभिमान म्हणजे काय देशांतल्या दगडमातीचा अभिमान ? अभिमान दगडमातीसाठीं वाटेल, पण ती तरी अभिमानास्पद असावी लागते! तिच्यावर आपले प्रतापी पुरुष वावरलेले असावे लागतात. तिच्यावर आपल्या संस्कृतीची पैदास झालेली असावी लागते. ही भूमि माझी आहे या आवेशानें लढतां—लढतां मेलेल्या आपल्या शूरांचे पुतळे मधून मधून तिच्यावर दिसावे लागतात. तिच्यांतील शेतवाडीवर खंडोगणीत गल्ला मालकीचा म्हणून गोळा करतां आला पाहिजे. परमेश्वरी इच्छेच्या प्रतिकूलतेची हद्द पायाला लागेपर्यंत तेथें सुखसंपत्ति व वैभव संपादितां यावें. बापाकडून कांहीं वारसा हटकून मिळणार या कल्पनेनें तेथें पिढ्या अनुस्यूत होत असाव्यात. पुत्रपौत्रांना आपली कमाई खास जाऊन पोंचणार या भावनेनें तेथें प्रयत्नवाद बळास लागलेला असावा. त्या ठिकाणीं आपल्या कर्तबगारीमुळें घरींदारीं समाधानवृत्ति नांदल्यानें स्त्रियांचा आपल्या ठिकाणचा प्रेमभाव द्विगुणित होत असावा. तेथें जीव कदरल्यामुळें नव्हे तर इहलोकच्या उपभोगानंतर भूतकाळांत पोहरा टाकण्याची आणि भविष्यकाळांत पतंग उडविण्याची बुद्धि होत असावी. अशी जर दगडमातीची भूमि असेल तर तिचा अभिमान. तुमच्या समाजाचा तरी महाराला कसला अभिमान ? त्यानें तुमच्यासाठीं कां झटावें व मरावें? असें कोणतें लागतेंपण त्याच्याशीं तुम्हीं राखलें आहे कीं, तुम्हांला दंश झाला तर त्याला घेरी यावी आणि तुमच्या अवमानाबद्दल त्याला संताप चढावा ? इतकेंहि असून आज जर विचारावयास गेलांत तर मी तुमचाच आहें असें म्हणावयास तो लाजणार नाहीं ! ही त्याची थोरवी आहे पण खरी गोष्ट अशी आहे कीं, तो

अशरण आहे आणि निराश्रित आहे लाथाडलांत तरी ' माईसाहेब मी तुमचाच ' असें तो म्हणणार.

ही स्थिति त्याच्या समाजाच्या दृष्टीनें तर आहेच. पण एकंदर आपल्या भवितव्यतेच्या दृष्टीनेंहि मनांत उतरवून घेण्यासारखीं आहे. आपण राजकारणाविषयीं बोलत आहों. ज्या देशांतील पांचसहा कोटि प्रजांना स्वदेशाभिमानाचीं अवश्य कारणें चांचपूनसुद्धां सांपडत नाहींत, त्या देशाला आपल्या राजकारणाची चांगलीच खबरदारी घ्यावयास पाहिजे. उद्यां जर दुसरीकडे कोठें मोठी वसाहत करावयास मुबलक जागा मिळाली आणि सर्व सुखसोयी आहेत असें कळलें तर सहस्रावधि अस्पृश्य देशांतर करतील आणि ' करणार नाहीं ' असें जर कोणी म्हटलें तर तें अशक्य म्हणून, बाकीचे स्वकीय येथें राहणार आणि वर सांगितलेली बाब अशक्य आहे म्हणून. उगाच खरी गोष्ट चोरण्यांत काय मतलब ? पण तो येथलाच आहे, तुम्ही यावयाच्या आधींचा आहे, येथें राहण्याचा त्याचा हक्क आहे, ही त्याची जन्मभूमि आहे; मात्र त्याच्या घरींच कहर झाला आहे, हा कहर बंद करावा. हिंदुस्थानावर प्रेम करावयास सबळ कारणें त्याला दिलीं पाहिजेत तर तो परकी सत्तेला आपल्यासारखा विन्मुख होईल. राजकारणाच्या यशाला आपल्यांतल्या फुटीर दर्जा चांगल्या भरल्या पाहिजेत. भेदनीतीनें राज्य करणें इतरांसारखेंच अथवा इतरांपेक्षां आपल्या आंग्रेज बहाद्दरांना चांगलें साधलें आहे. चिलखताचा सांधा दिसे न दिसेसा असला तरी त्यावर अचूक तीर मारण्यास जो चुकत नाहीं तो उघड उघड भगदडावर न मारील तर मूर्ख ! भेदनीतीच्या खेळाला आरंभ झालेलाच आहे. त्याच्या पदरीं लोभवून टाकणारीं आमिषें फार आहेत. ज्याला पूर्वीचा कांहीं चिकटा असेल तो सहसा फसणार नाहीं. पण नसेल तर केवळ तद्रूपता पावेल. अजून जातिजातींचीं, हिंदूमुसलमानांचीं, भिन्न भिन्न प्रांतांतील लढवय्या

लोकांचीं, हिमालयाच्या पहाडापलीकडील धटिंगणांचीं व आमचीं भांडणें पिकविण्याचें किती तरी हुकूम शिल्लक आहेत पण सगळ्यांत जोराचा हुकूम ह्मणजे अस्पृश्यता! त्याच्यांतून कारकूनही सांपडतील आणि शिपाईहि सांपडतील. या गोष्टी हटकून यशस्वी होतील असें मुळींच ह्मणावयाचें नाहीं. पण आजचें मरण उद्यांवर ढकलण्यास आणि येथील केवळ एतद्देशीय राजकारण-क्षेत्रांत धुल्ला माजविण्यास ही पुरेशी सोय आहे. एखादी प्रचंड सभा पांचपन्नास माणसांना गिल्ला माजवून सहज उधळून देतां येते आणि हाता तोंडाला आलेलें यश आपल्यांतील विचक्यामुळें पदरीं पडेनासें होतें हें ध्यानांत पाहिजे. शिवाय दुसरी एक जाचणूक उत्पन्न होण्याचा संभव आहे. राजकीय हक्काची ढकलाढकली होऊं लागली आणि तीहि अस्पृश्यांच्या 'फटकूनच राहीन' या ह्मणण्याच्या बळावर; तर आपले मुसलमान-बंधूहि असें ह्मणूं लागण्याचा संभव आहे कीं, हीं तुमचीं भांडणें आतां आवरतीं घ्या. तर ती शिकवण इतरांकडून येण्याच्या आधींच आपलें घर आपण साफसूफ केलेलें बरें. पण हें सगळें अगदीं आजच्या संबंधानें झालें. ही भूमिका फारशी उंच नाहीं. वर सांगितलेली देशप्रेमाची गोष्ट मात्र अगदीं भिन्न आहे. हिंदुस्थान स्वतंत्र व्हावयास पाहिजे म्हणून हा प्रश्न निकालांत निघणें जितकें जरूर आहे त्याहीपेक्षां तो स्वतंत्र झाल्यावर तसाच राहावा यासाठीं जास्त जरूर आहे. महारापोरापर्यंत स्वदेशाभिमान सकारण पोंचला म्हणजे कसल्याही शत्रूला भिण्याची आम्हांला जरूरी नाहीं. पण स्वदेशांतच मानमरातबानें राहावयास सांपडल्यामुळें जरी देशप्रेम वाटूं लागलें तरी एकंदर समाजाशीं एकदिल होणें अवश्य आहे. आणि हा एकदिल वरील समाजानें औदार्य दाखविल्याशिवाय व अर्थात् अस्पृश्यांनीं आपल्या सुधारणा झटाझट करण्याची तत्परता दाख-

विल्याशिवाय होणार नाहीं. पण सुशिक्षित म्हणून, ज्ञानी म्हणून, कर्तबगार म्हणून आणि जबाबदार म्हणून वरील समाजाकडे जास्त काम येणार हें उघड आहे.

अस्पृश्यतेचा सामाजिकदृष्ट्या विचार बहुजनसमाजाला अत्यंत अप्रिय वाटण्यासारखा आहे यांत शंका नाहीं. राजकारणाच्या मैदानांतच आधुनिक थोर पुरुष वावरत असल्यामुळें आणि राजकारणाच्या वेदना प्रत्यहीं दरघरीं पोंचत असल्यामुळें तोच विषय सर्वतोमुखीं असावा आणि सामान्य जनसमाजालासुद्धां प्रिय वाटावा हें बरोबर आहे. इतकेंच काय, पण त्याच राजकारणाच्या दृष्टीनें केलेला अस्पृश्यतेचा विचार समाजाला थोडा तरी पटण्याचा संभव आहे. त्यांत एका अप्रिय व्यवस्थाशीं झुंज असल्यामुळें ईर्षेचा भर वाटेल ती गोष्ट समाविष्ट करून घेतो. कोणत्याहि संकटाच्या प्रसंगीं विषमभाव बाजूस ठेवावेसे वाटतात, कारण कार्यसिद्धीची निकड लागलेली असते. पण जी गोष्ट लगबग व्हावी म्हणून केली जाते ती पायाशुद्ध आणि हेतुपुरस्सर केली जाते असें वाटत नाहीं. विषमता घालवावयासाठीं मूलतः केलेला विचार तो नसतो. कांहीं काळपर्यंत म्हणजे कार्यसिद्धि होईपर्यंतच तो टिकून राहील अशी शंका येते. लढाईच्या वेळीं ढोलगें गळयांत अडकवून ‘ दादासाहेब, काकासाहेब, तुम्ही-आम्ही एक’ असें जें इंग्रज डोंबारी ओरडत होता तें त्याचें ओरडणें म्हणजे शुद्ध बाता होत्या हें युद्धानंतर विषमतेचा वेताळ पूर्वस्थळाला आला यावरून उघड दिसतें. संकटें नाहींशीं झाल्यावर, मारलेला अगर गति दिलेला नव्हे तर कुपींत घालून गाडलेला, झुटिंग पुनः वर मान करून चारहि खंडांत नाचूं लागला आहे, याचें कारण अगदीं उघडें आहे. विषमता काढावयास इंग्रज प्रवृत्त झाला नव्हताच. आग लागलेल्या घरावर पाणी ओतावयास ‘ बाहेर ’ च्या मांगाला त्यानें

जवळ केलें होतें इतकेंच. प्रस्तुत प्रकरणींहि असेंच होण्याची भीति आहे. राजकारणांतील तेढ लक्षांत घेऊन अस्पृश्यतेसंबंधीं अनुकूलता दाखविणें हें समयज्ञतेचें लक्षण असेल; पण त्यांत खोलपणा जरा कमी आहे असेंच म्हणावें लागेल. ही बाब जातितः सामाजिक आहे, म्हणून सामाजिक दृष्ट्या विचार करून जे या प्रश्नासंबंधानें अनुकूल मत प्रदर्शित करतात त्यांची बुद्धि या विषयाच्या बुडाशीं पोंचली असें ह्मणतां येईल. पण सामाजिक दृष्टीनें याचा न्याय कबूल करून पत्करावयाचा म्हणजे आजपर्यंत मनाला चिकटून राहिलेल्या व म्हणूनच प्रिय वाटणाऱ्या समजुती व कल्पना सोड-ण्याचा प्रसंग प्राप्त होतो. अर्थात् ही गोष्ट जरा कठीणच आहे. म्हणून वर म्हटलें आहे कीं, अस्पृश्यतेचा सामाजिक दृष्टीनें केलेला विचार अत्यंत अप्रिय वाटण्यासारखा आहे.

असो. अस्पृश्यतेची न्याय्यता ठरवितांना अगदीं पहिली कल्पना जी सांगण्यांत येते ती ही कीं, अस्पृश्य लोकांची पूर्वपरंपरा कुलो-त्पन्नतेच्या बाबींत असावी तितकी शुद्ध नाहीं. उच्च जातींत निघा-लेल्या कांहीं कुलटा स्त्रियांपासून प्रतिलोमपद्धतीनें झालेली ही प्रजा आहे. केवळ धर्मग्रंथावर जे भूतकालीन माहितीसाठीं अवलंबून राह-तात त्यांचें असें मत असेल; पण इतिहासावर जे अधिक विश्वस-तात त्यांची साक्ष अशी नाहीं. त्रैवर्णिक आर्यांनीं आपल्या तेजानें दिपविलेली व मग दास्यकर्मांत कायमची डांबलेली ही प्रजा आहे इतकाच त्यांचा अभिप्राय आहे. धर्मग्रंथांतील प्रतिलोम-उत्पादनाच्या आरोपाविषयीं फार झालें तर इतकेंच म्हणतां येईल कीं, असली उरफाटी प्रजा ह्या दास्यकर्मांत बांधलेल्या लोकांच्यासारखीच नीच समजली जात असे. पण वास्तविक पाहतां अस्पृश्यतेसंबंधानेंच जेथें वाद चालू असेल तेथें हा कुलोत्पन्नतेचा प्रश्नच उद्भवूं नये. अस्पृ-श्यांशीं शरीरसंबंध घडवून आणावे कीं नाहीं असले प्रश्न ज्यांना

उकरून काढून धोपटीत बसावयाचे असतील त्यांनीं आणि त्यांच्याशीं वरील उत्पत्तिवाद खुशाल करावा. आमचा मुख्य विषय अस्पृश्यता हा आहे. तेव्हां या लोकांना अस्पृश्यतेंतून काढावें असें म्हणतांच जे कोणी हा उत्पत्तीचा सवाल पुढें टाकतात त्यांना इतकेंच सांगावयाचें कीं, हें बोलणें अप्रस्तुत आहे. आम्ही जर रक्तमिश्रणासंबंधानें चर्चा सुरू केली असती तर तुमच्या म्हणण्याचा विचार करतां आला असता.

याच्या पुढला मुद्दा असा आहे कीं, हे लोक घाणेरडे धंदे करतात, गुरें फाडतात, तेव्हां त्यांना स्पर्श कसा करावा? आतां मोऱ्या, नाले उपसणें, गुरें फाडणें इत्यादि धंदे हे लोक करतात हें इतकें खरें आहे कीं तें नाकबूल करतांच येत नाहीं. पण येथें प्रत्युत्तरादाखल इतकेंच विचारावयाचें कीं, त्यांना काय याच गोष्टी करावयाची हौस आहे? का दुसरें कांहीं त्यांना करतां येण्यासारखें नाहीं? पण तुम्ही चार माणसांत येऊं द्याल तर कीं नाहीं? तुम्हा त्रैवर्णिकांना हे धंदे व्हावयास तर पाहिजे असतात, पण स्वतः करण्यांत मानहानि वाटते आणि हें महारामांगाचें भरताड तुम्हांला आयतेंच सामाजिक वेठीला सांपडलें म्हणून ते हे धंदे करतात. त्यांना या धंद्याच्या बाहेर फिरकूं देतो कोण? आधीं नाकें कापावीत, जोडावयाचा यत्न केला तर जोडूं देऊं नयेत आणि मग ' तुम्ही नकटे ' म्हणून हिणवावें, ही नीति मतलबी थोरांना शोभते खरी ! आधीं शस्त्रें काढून घ्यावीत, कोणी परजूं लागला तर त्याचा हात कलम करावा आणि मग " तुम्ही दुबळे स्वसंरक्षण काय माती करणार " असें म्हणत राहावें, हा दुसरीकडे राज्यें करावयास सोकावलेल्या लोकांचा धडा, अस्पृश्य लोकांच्या बाबतींत त्रैवर्णिक चांगलाच गिरवीत असतात! येथें अशी एक शास्त्रीय कोटी करण्यांत येते कीं, " प्रत्येक समाजांत असलीं कामें करावयास कांहीं माणसें पाहिजेत

व तीं प्रत्येक समाजांत आहेतहि; मग येथील माणसांनींच एवढा बोभाटा कां करावा?" यावर उत्तर अगदीं सोपें आणि सरळ आहे. इतर समाजांत ही नीच कामाची वेठ अमुक एका सबंध जातीच्या माथीं मारलेली नाहीं. असलीं कामें करण्याइतपतच बुद्धि व अभिरुचि ज्यांच्या पदरीं असेल तेच लोक त्या समाजांत हीं कामें करतात व हा धंदा सोडून आपलें दैव काढण्याचा अन्यत्र प्रयत्न करूं लागले तर फारशी अडचण त्यांना येत नाहीं. आपल्या येथें मात्र त्या लोकांना, कदाचित् त्यांच्यापैकीं कांहींना तरी निदान अधिक चांगले धंदे करतां येण्यासारखे असूनसुद्धां याच गोष्टी करण्यावांचून गत्यंतर नसतें.

बोलणें येथेंहि अडलें म्हणजे या प्रश्नाला विन्मुख असलेले लोक परत फिरून एका मोठ्या जबरदस्त किल्ल्याच्या आश्रयाला जातात व तेथून वादाला सुरुवात होते. तें म्हणतात, "महारमांग लोक जे हे धंदे करतात ते काय आम्ही म्हणतों म्हणून करतात? ते त्यांना "सांगितलेले" आहेत. ज्याला त्याला त्यांचीं कामें लावून दिलेलीं आहेत; त्याला आम्हीं काय करावें? जो ज्या जातींत जन्माला आला असेल त्या जातीचें कर्म त्यानें करीत राहावें हा आम्हां हिंदूंचा धर्मच आहे. त्या जातींत तो जन्माला कां आला हें त्यानें आपल्या पूर्वसंचिताला विचारावें, लोकांवर चरफडून काय होणार?" या थोड्याशा वाक्यांत आमच्या पूर्वकालीन समाजविषयक कल्पना, तत्त्वज्ञानविषयक अनुमानें, समाजशासनपद्धति इत्यादि बाबी स्पष्ट प्रतिबिंबित झालेल्या आहेत. एखाद्या ऐदी अजागळाच्या तोंडून जरी हे शब्द निघाले तरी सुद्धां ते विचारांत घेण्यासारखे आहेत; मग जबाबदार शास्त्रांनीं त्यांचा जेथें उच्चार केला आहे तेथें त्याची हेटाळणी करून चालावयाचें नाहीं. आपणच कोणी शेकोजी समाजविषयक विचार करावयास निघालों आहोंत,

आतांपर्यंत भक्कम कल्पनांवर उभारलेलें असें व्यवस्थित रूप समाजाला देण्याचा यत्नच झाला नाहीं, अशा अभिनिवेशानें या प्रश्नासंबंधानें कोणींहि लिहूं नये. वरील अवतरणचिन्हांकित वाक्यांत दोन ठळक गोष्टी अंतर्भूत झालेल्या आहेत; आमची वर्णाश्रमधर्मप्रधान समाजव्यवस्था व पूर्वसंचितानुरुप प्राप्त होणारा पुनर्जन्म हें तत्वज्ञान. ज्या अनेक गोष्टींच्या बळावर हिंदूसमाज सहस्रावधि वर्षें उभा आहे त्यांपैकीं या दोन अत्यंत महत्वाच्या होत आणि याच कारणामुळें अजुनसुद्धां ज्याच्या मनावर थोडा तरी धार्मिक वाङमयाचा संस्कार झाला असेल अगर संस्कारयुक्त गृहस्थितींत ज्याची वाढ झाली असेल अशा प्रत्येक हिंदु मनुष्याचें मन या पूर्वकालीन समाजव्यवस्थेच्या–पडापड झालेल्या का होईना–पण भव्य इमारतीकडे मधून मधून गेल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं. पृथ्वीवरील कोणतीहि समाजव्यवस्था अनंत कालपर्यंत हटकून टिकून राहील असें मानणें म्हणजे मनुष्याला त्रिकालज्ञ बनविणें होय. तो त्रिकालज्ञ तर नाहींच नाहीं. पण भूतकालीन अनुभव आणि सद्यःकालीन गरजा यांचा मिलाफ घालून मात्र तो आपल्या समाजाची व्यवस्था करीत राहणार. पृथ्वीच्या पाठीवरील अनेक मानववंश इतिहासांत आपलीं नुसतीं नांवेंच ठेवून कालवश झालेले आम्हांस दिसतात. ते ज्या देशांत वस्ती करून असत त्या देशांत सध्यांहि त्यांच्याच नांवाचे समाज नांदत आहेत. पण हे आतांचे समाज त्या जुन्या समाजांच्या हाडामांसाचें आहेत अगर निदान त्यांनीं निर्मिलेल्या संस्कृतीचे औरस वारसदार आहेत असें म्हणतां यावयाचें नाहीं. त्या त्या ठिकाणच्या वर्तमानकालीन समाजांनीं प्राचीनांचीं नांवें जर चालू ठेविलीच असलीं तर त्यांत केवळ भौगोलिक यथार्थता आहे इतकेंच समजावयाचें, पण आमच्या येथें अशी गोष्ट नाहीं. रक्तधारा आणि संस्कृतीचा झरा हीं दोनहि जवळ जवळ निर्भेळपणें सारखीं चालू आहेत. सहस्रावधि वर्षांच्या तावडीं-

तून आपल्याला सोडवून घेऊन ज्या समाजव्यवस्था व जीं तत्वज्ञानें, केवळ ग्रंथालयांत नव्हे तर समाजाच्या घरींदारीं, व्यवहारांत आणि मनःप्रकृतींत कायमची रुजलेलीं दिसतात, त्यांच्या अंगांत कांहीं जातिवंत स्थैर्य आहे असें मानावयास कांहीं हरकत नाहीं. टिकलेल्या हिंदूसमाजाला एवढें टिकाऊ रुप देणारें कांहीं बंधन, नियम व तत्त्वज्ञान खास होतेंच होतें. पण ह्या पूर्वकालीन आधारभूत गोष्टींच्या गौरवांत मन सारखें राहूं दिलें तर वर्तमानकालीन जगाकडे अगदीं दुर्लक्ष केल्यासारखें होतें आणि म्हणून आपल्या समाजाच्या हिताची काळजी वाहणाऱ्या प्रत्येकानें, परंपरागत गोष्टींबद्दल आदर बाळगूनसुद्धां, नवीन विचार केला तर त्यांत काय बरें वावगें होईल ?

ज्यानें त्यानें आपापलीं कर्तव्यें करावींत हें वाक्य मोठें कर्णमधुर आहे, पण त्याची अंमलबजावणी स्वतःच्या चारित्र्यांत करितांना त्यांतील मधुरता नाहींशी होते. मी हेंच कर्म कां करावें असें महारानें विचारलें तर गीतादि ग्रंथांतील वाक्यें उद्धृत करून त्याच्या धर्मबुद्धीला आव्हान करावें आणि आपला उपदेश त्याला पटवावा अशी नीति लोक आचरतात. पण हें पांडित्य फक्त परोपदेशांतच नांदतें, ह्या गोष्टीची आठवण एकमेकांना देणें कदाचित् गैरसोयीचें असेल, पण जरूर मात्र आहे. “ भगवंतांनीं लावून दिलेलें ” ब्राह्मणाचें कर्म कोणते ब्राह्मण आचरीत आहेत ? अध्ययनअध्यापनादि कर्में जशा प्रकारें ब्राह्मण लोक सध्या करतात त्याच प्रकारानें करणें जर धर्मसंमत असेल तर धर्माला कांहींच उच्च ध्येय नाहीं असा त्याचा अर्थ होईल. पोट भरावें म्हणून जशा प्रकारचें ज्ञान अमुक एक प्रकारें सांगावें असें वरून सांगण्यांत येईल त्याच प्रकारचें ज्ञान ब्राह्मण शिक्षक देत असतो हें एक; शिवाय कोणी लोखंडाचें दुकान घालून बोहरी होतो; कोणी शिंपी लोकांना बाजारपेठेंत जागा महाग करतो, कोणी खेडेगांवांत राहून आपली वृत्ति

विसरून गहाणें डुलवावयास शिकतो, आणि कदाचित् कोणी कोणी एकीकडे ब्राह्मण्याचा जळजळीत अभिमान बाळगून सुद्धां, सुधारकांना निंदून सुद्धां, उत्तम कांचेच्या कपाटांत "श्रीक्षेत्र वांई-हून" आणलेले सुंदर लाल जोडे ठेवून विकावयास उभा राहतो. ज्या सेवाधर्माला म्हणजे नोकरीला धर्मग्रंथांत श्वानवृत्ति असें नांव दिलें आहे तींवरच केवळ ब्राह्मणसमाज तगून आहे. हें ब्राह्मणां-विषयीं झालें पण जसे ब्राह्मण तसेच क्षत्रिय हीं वर्णाश्रमधर्माचे मोठे अभिमानी असतात. त्यांनाहि असें विचारणें जरूर आहे कीं, आपल्या क्षत्रियत्वाचें काय झालें? सध्या आपल्या तरवारी कोठें आहेत? गेल्या दिवाळींत प्रस्तुत लेखक नगर जिल्ह्यांत फिरत असतां एका मराठा गृहस्थानें 'कुटेल आमारावर मराठ्यांचें लढणें' हें त्यांच्या क्षत्रियत्वाचें निदर्शक म्हणून सांगितलें! खरोखर हें उत्तर अत्यंत विषाद उत्पन्न करतें. कोण, कोणासाठीं, कोठें लढतो ह्या त्रिकोणाच्या पोटांत वरील विषादवृत्तीची मीमांसा सांठविलेली आहे, हें सुज्ञ वाचकांस सांगावयास नको. शिवाय आपलें जन्मजात कर्तव्य म्हणूनच जर क्षत्रिय द्वीपांतरी गेले असते तर रंगरूटें पक-डण्यासाठीं जुने बाजार कां धुंडावे लागते? आणि मुंडण करून गोसाव्यांचीं रंगरूटें कां करावीं लागलीं असतीं? वैश्यांचेंहि असेंच आहे. खालीं गळलेल्या बुंदीच्या कळ्या खा—खाऊन पुष्ट झालेल्या बाढण्यापेक्षां वैश्यांची जास्त मातब्बरी नाहीं. वरील मजकूर कोणाला खिजविण्यासाठीं लिहिला नाहीं. आपद्ग्रस्ताला खिजविण्यांत कोणतें शौर्य? पण वस्तुस्थितीच्या यथादर्शनासाठीं लिहिलेला आहे. परो-पदेशाला प्रवृत्त होण्याच्या आधीं आत्मशोधन थोडेंसें करावें हें व्यवहारदृष्ट्या योग्य होईल, म्हणून तुझें काम तूं कर असें महाराला प्रतिपादण्यांत कांहींच गौरव नाहीं. जसे आपण बाकीचे लोक आपला संसार सुखाचा करण्यासाठीं प्रसंग पडेल त्याप्रमाणें आचार

करतो त्याप्रमाणेंच त्याचाहि संसार सुखाचा व्हावा म्हणून, जी कांहीं थोडी भाकरी आपल्या या हतभाग्य देशांत शिल्लक राहिली आहे तिचा हिस्सा त्याला त्याच्या योग्यतेनुरूप मिळूं द्यावा हें देश-बंधुत्वाच्या म्हणजे सहोदरत्वाच्या नात्याला योग्य होईल. भांडण हें आहे कीं, देशांतला उरलासुरला मलिदा तुम्ही त्रैवर्णिक खातां आणि अस्पृश्याला एकजात बहिष्कारामुळें संसारांत जिगजीग उत्पन्न होते. येथेंच जातां जातां हेंहि सांगितलें पाहिजे कीं, आपण त्रैव-र्णिक सोयीसाठीं कोणतेहि भिन्न भिन्न धंदे आचरित असलों तरी आपल्याला जन्मानें मिळालेली जात गेली असें आपण मानीत नाहीं म्हणून धंद्यांत सरमिसळ झाल्यानें मागोमाग जातींचाही संकर होईल असें भय जातीस जपणाऱ्या माणसांनीं मुळींच बाळगूं नये.

यापुढें पुनर्जन्माविषयींहि थोडेंसें अवश्य लिहिलें पाहिजे. मी अस्पृश्य कां, असें महारानें विचारलें तर पूर्वसुकृतानुरूप तुला ही योनि मिळाली आहे असा जबाब देण्यांत येतो. आतां हें पूर्वजन्मींच्या कृतीचें तत्व खरोखर अत्यंत उदात्त आहे. परंतु त्याचा उपयोग केवळ ज्या ठिकाणीं व्हावयास पाहिजे त्यापेक्षां जास्त ठिकाणीं केला जातो. एकाद्यानें प्रयत्न केले, अंगच्या सर्व शक्ति वाढीस लाविल्या आणि त्यांच्या बळावर तो कांहीं साध्य करूं लागला असतां जर त्याला अपयश आलें, किंवा कोणी कुलाच जन्मला, घर पडून मेला, किंवा स्वतःचा कोणताहि दोष नसतां जन्मभर दुःखीच राहिला तर त्याच्या समाधानासाठीं हें पूर्व-सुकृताच्या फळाचें तत्त्वज्ञान आहे. आपली शिकस्त करूनहि जर सुख पाठमोरेंच राहूं लागलें तर या तत्त्वज्ञानाशिवाय समाधानाला दुसरी कोणतीहि जागा नाहीं. परंतु जें केवळ अदृष्टाच्या अर्थशोधासाठीं असावें, तें मनुष्यकृत गोष्टींच्या समर्थनार्थ उपयोगांत येऊं लागलें आहे. जी गोष्ट करतां आली असती किंवा टाळतां आली असती अथवा बदलतां आली असती,

आणि तीहि आपल्या अंगच्या बळावर, ती " तुला जन्मानेंच प्राप्त झाली आहे म्हणून भोग " असें सांगणें म्हणजे रोग कां झाला हें कळत असतांना सुद्धां औषध न घेऊं देण्यासारखें आहे.

इतर देशांत, अत्यंत गरीब कुळांतील माणसांना सुद्धां, नशीब काढण्यास आपल्याइतके प्रत्यवाय नाहींत. कोठें कोठें तर बिलकुलच नाहींत. ज्या गोष्टी त्यांच्या बुद्धीच्या आणि आवांक्याच्या बाहेरच्या असतील, त्या संबंधानें कोण काय करणार ? पण तोपर्यंत तरी माणसांनीं आपल्या सोयीसाठीं केलेल्या गोष्टी तत्त्वज्ञानाच्या नांवावर विकून अस्पृश्याला भोळा करून ठेवूं नये. उद्यां एकाद्या देशांतल्या लोकांनीं आपल्या देशांतील कांहीं बांधवांवर " खाली डोकें वर पाय करून चालावें " अशी शिक्षा फर्मावली व असें कां म्हणून विचारतां हें तुझ्या मागील जन्मींच्या कृतींचें फळ आहे असें त्याला सांगण्यांत आलें तर त्यानें काय तें निमुटपणें सोसावें ? तसेंच उद्यां जर इंग्रजांनीहि आम्हांला आमच्या मागील जन्मींच्या पापकृत्यांचीच फलरुप अवस्था आमची सध्याची स्थिति आहे, आणि म्हणून ती आम्हीं निमुटपणें भोगली पाहिजे, असें सांगितलें तर मग ह्या कर्मभूमींतील कर्मयोगाचें रहस्य तें काय ? कर्मशूर व्हा म्हणतां आणि कर्म तर करूं देत नाहीं यामुळें तत्त्वज्ञान आणि व्यवहार यांची फारकत होत आहे. जन्म हा दैवायत्त राहील; पण पौरुष मात्र ' मदायत्त ' आहे असें प्रत्येकास म्हणतां यावें.

तसेंच पृथ्वीवरील अवघे समाज कोणत्या तऱ्हेनें पुरुषार्थ साधीत आहेत हें पाहिलें तर आमच्या देशांतील कोट्यवधि प्रजाजनांच्या अंगांतील शक्ति आणि भावना केवळ मातीच्या मोलानें जात आहेत, असें वाटतें. त्यांचें जिणें म्हणजे शेरडीच्या शेपटासारखें झालें आहे. " लाजहि झांकीना आणि मशाहि वारीना ! " देशांत वैभव, संपत्ति, सुखें, कलाकौशल्य आणि विद्याभिवृद्धि हीं प्राप्त होण्यास

देशांत असलेलीं कोट्यवधि माणसें वाऱ्यावर सोडून कसें चालेल ! युद्ध उपस्थित झालें तेव्हां घरच्या मुलांच्याहि फौजा बनवून युरोपियन राष्ट्रांनीं त्यांच्याकडून देशाची सेवाचाकरी करून घेतली. रशियानें बायकांचीहि पलटणें केलीं आणि पादाक्रांत केलेल्या रशियाचा बाजार हस्तगत करावा म्हणून जर्मन लोकांनीं पुरुष नव्हते म्हणून ३६००० स्त्रियांना ऐन युद्धांत अर्थशास्त्राचें शिक्षण दिलें ! पण आमच्या येथें पहा माणसें स्वस्त झालीं ! कोणी अभाळांतून बॉम्ब टाकून त्यांना जिवें मारावें आणि ही दैवाची कर्कशता ज्यांच्या वांटणीला येते त्यांनींच आपले पांच कोटी बांधव स्पर्शयोग्यहि नाहींत असें समजत रहावें !

वरील सर्व लिहिणें अस्पृश्यांच्या चिरकालिक महत्त्वाच्या तक्रारीसंबंधानें झालें पण महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं हिंडून प्रस्तुत लेखकानें जें कांहीं पाहिलें त्यावरून अगदीं आजच्या घटकेला अस्पृश्यांच्या काय तक्रारी आहेत, हें अगदीं थोडक्यांत खालीं देतों. कसले कां होईनात, पण जे कांहीं जुने धंदे होते ते नवीन मनूंत हळूहळू पार नाहींसे झाले आहेत आणि मुंबईसारखीं ४।५ शहरें सोडलीं तर नवीन धंद्यांत कोठेंहि शिरकाव होत नाहीं अशीं कुचंबणा चांभारांशिवाय बाकीच्या अस्पृश्यांची होत आहे असें स्थूलमानानें म्हणतां येईल. एका संस्थानांत तर “ यःकश्चित् पोलीस शिपायाची नोकरी सुद्धां आम्हांला देत नाहींत ” अशी तक्रार महारांनीं केली. एके गांवीं सडका झाडणाऱ्या महारणीला २॥ रुपयांचा मासिक तनखा देण्यांत येतो असें कळलें. दुसऱ्या एके ठिकाणीं सबंध दिवस काम करून ५ आण्याची मोळी विकल्यावर घरच्या बाळंतीण बायकोला आणि दोन कच्च्याबच्च्यांना कसें तोंड दाखवावें ह्या विचारानें लाजलेला महार भेटला. दुसऱ्या एके ठिकाणीं सरकारीच पण अगदीं अळणी अंमलदारापर्यंतचे अधिकारी सुद्धां लांकडें फोडावयास कांहीं एक

मोबदला न देतां बोलावतात आणि नित्यप्रसंग त्यांच्याशींच असल्या-मुळें जाणें भाग पडतें, अशी तक्रार महारांनीं केली. एके गांवीं शेतकरी लोक ठरावांपेक्षां जास्त कामें सांगतात आणि तीं केलीं नाहींत म्हणून बलुतें देत नाहींत अशी तक्रार या लोकांनीं केली. कांहीं कांहीं गांवीं पाण्यासाठीं ३।३ तास आक्रंदन करावें लागतें; आणि वडार बेरडहि ज्या ठिकाणीं पाणी भरूं शकतात, तेथें आम्हांस पाणी भरूं देत नाहींत म्हणून घाणेरडे ओढे खोडे धुंडावे लागतात, अशी तक्रार ऐकूं आली. एके ठिकाणीं घोड्यावर बसून गांवांत फिरण्यास महारास सामाजिक रीत्या प्रत्यवाय आहे असें कळलें. या तक्रारींची याद पुष्कळ मोठी देतां येईल. एकंदरींत तक्रारींत अज्ञानजन्य अतिशयोक्तीचा कांहीं थोडा भाग असेल. पण तो वगळून सुद्धां अस्पृश्याला त्याचें जिणें अधिक सुखाचें करण्याला बाकीच्या प्रजेइतकांहि संधि नसल्यामुळें त्यांना हाल सोसावे लागतात. हें खरें आहे. एकाच सार्वजनिक वरवंट्याखालीं आपण सगळेच सांपडलों आहोंत; परंतु हा एक त्रैवर्णिकांच्या हातचा पोटवरवंटाहि त्याला डोक्यावर फिरवून घ्यावा लागत आहे त्यामुळें तो अत्यंत उद्विग्न होतो. आणि अशा उद्विग्नतेच्या काळीं ज्या सुंदर धर्मतरुच्या गार छायेखालीं त्याच्या संतप्त जीवात्म्याला विसावा मिळावा, तो धर्म त्याला तूं नीच आहेस असें सांगतो आणि धर्माचा उपदेष्टा गुरु त्याच्या जिवाला समाधानाचें भातुकें पोंचविण्याच्याएवजीं सावलीच्याही विटाळाच्या भीतीनें दहा कदमांवरून दूर पळतो.

वास्तविक पहातां धर्म केवढे उपकार करतो पहा. समाजाचें धारण करून आपल्या पोटांतील प्रत्येक माणसाला जितकें ज़ास्त सुख देतां येईल तितकें देण्याची खटपट करतो; अंगावर आलेल्या अस्मानी संकटांचीं कारणें त्याला पूर्वसंचितांत शोधावयास लावून भविष्यत्काल सद्गुणाच्या जोरावर सुखाचा करतां येईल

अशी शिकवण तो त्याला देतो; आणि त्याचा जीव दारिद्र्यानें ओशाळला किंवा अवमानानें चिडून गेला तर जवळ जाऊन त्याला गोंजारून आणि धीर देऊन नित्य नवीन उगवणारी ‘ उद्यां ’ आजच्यापेक्षां खरोखरच जास्त आनंदाची येईल असा विश्वास त्याच्या ठिकाणीं उत्पन्न करतो. पण धर्माची ही सगळी कर्तबगारी अस्पृश्यांच्या बाबतींत शून्यच असते. ‘ समाजव्यवस्था, समाजव्यवस्था ’ म्हणजे त्रैवर्णिकांच्या सुखसोयींची दक्षता ती राहावी म्हणून ज्या गुणांच्या बळावर इहलोकींची यात्रा त्याला अधिक सुखाची करतां आली असती त्या गुणांच्या प्रसराला अवसर न देणें हाच धर्म झाला आहे. पूर्वसंचितानेंच तूं ‘ नीच ’ योनींत जन्माला आला आहेस असें त्याला सांगून धर्म त्याच्या मनोबलाची अर्धीअधिक हत्या करतो आणि सद्विचार, सदाचार, ज्ञान इत्यादींच्या सान्निध्यापासून त्याला दूर ठेवतो. अर्थात् तो अनीति, अमंगल विचार, दुष्ट वासना आणि मलिन वाणी अशा कर्दमांत वाढतो. मरणोत्तरकालाविषयीं बेफिकीर होऊन इहलोकच्या आचारांत बेफाम बनतो. त्यानें धर्म ऐकावा कोठें आणि शिकावा कोठें ? ज्या मंदिरांत धर्मावर प्रवचनें चालावयाची, प्राचीन थोर विभूतींच्या सुरस आणि उत्साहवर्धक कथा ऐकावयास सांपडावयाच्या, आणि साधुसंतांच्या प्रेमळ वाणीचा रंग लुटावयास मिळावयाचा, त्या मंदिरापासून त्याला मोठ्या अदबीनें आणि भयानें दूर सरावें लागतें. आश्रमव्यवस्थेंत त्रैवर्णिकांना संस्कारयुक्त जीवित लाभतें आणि त्यांच्या पारमार्थिक कल्याणाची काळजी वाहिली जाते. अस्पृश्याला दोनहि गोष्टींना मुकावें लागतें. साधुसंतांनीं धर्म त्याच्या घरींदारीं पोंचविला असला तर ती गोष्ट आश्रमव्यवस्थेनें गौरवासाठीं आपल्याकडे ओढून घ्यावी. पण तिनें ती योजना बुद्धिपुरस्पर केली असें कधींही म्हणतां येणार नाहीं.

असो; अशा प्रकारें धर्मापासून फलित होणाऱ्या सर्व हितापासून अस्पृश्य कायमचाच दुरावलेला राहिला आहे. अर्थात् कशा प्रकारच्या पूजाअर्चेकडे त्याचें मन वळलें असेल आणि मनुष्याला सहज अशी जी धर्मबुद्धि तिला कसला व्यवसाय त्यानें प्राप्त करून दिला असेल हें सहज अनुमानितां येण्यासारखें आहे. त्याचे देव म्हणजे मरीआई, जाखाई, जोखाई, तुकाई, म्हसोबा, बिरोबा फार झालें तर खंडोबा, ढेगू, मेगू अशासारखी अक्राळविक्राळ, भेसूर, शेंदूर माखलेली, कोंबडी मागणारी, शिरा ताणल्यानें अंगांत येणारी, वेताळाच्या प्रकृतीची आणि झुटिंगाच्या हट्टाची मंडळी आहेत. यांची पूजा म्हणजे पूज्य वस्तूच्या थोर गुणाबद्दल वाटणाऱ्या आदराचें प्रदर्शन नव्हे, तर भेडसावणाऱ्या सावल्यांना लांच चारण्याचा प्रयत्न आहे. तिनें अस्पृश्याच्या जिवाला शांति आणि आनंद लाभत नाहींत तर नाकेदाराला जकात दिल्यासारखें वाटतें इतकेंच. संसाराच्या व्यापांतून बाहेर ओढून काढून त्याचें मन आपल्या गोड आणि मऊ वेष्टनांत, कांहीं वेळ का होईना, पण अडकवून ठेवील असें उदात्त तत्त्व या पूजेंत नाहीं. थोर विभूतीच्या गुणोत्कर्षाचा, गोलानें चढत जाणाऱ्या पायऱ्यांचा, म्हणजे ध्येय दाखविणारा आणि वाटाड्याचेंहि काम करणारा, सुंदर मनोरा या पूजेंत अस्पृश्याला दिसत नाहीं. आणि सर्वांच्याहि वर, चारापाणी मिळविण्याच्या खटपटींत असतांना आणि भिन्न भिन्न प्रवृत्तींच्या माणसांशीं प्रसंग आले असतांना, झोक जाऊन जीं पातकें आपल्या हातून घडतात त्यांच्या रुखरुखीनें पोखरलेलें आणि मरणाच्या दटावणीनें घाबरलेलें आपलें मन, ' मामेकं शरणं व्रज म्हणजे मी तुझा त्राता बनेन ' या परमेश्वरी आश्वासनानें निर्धास्त होऊन जसें विसावा पावतें, तसा कांहींहि प्रकार मरीआईच्या पूजनांत अस्पृश्याला होत नाहीं. पेंढार येणार म्हणून आवई उठली म्हणजे जसा दाणागोटा गोळा करून त्याच्या तोंडा-

वर टाकावयाचा, तसा जरीमरीला 'अंड्यांचा गुडघ्याइतका ढीग' व्हावयाचा इतकाच त्याचा अर्थ. अशा प्रकारच्या थोरांच्या हयगयींत सांपडल्यामुळें अस्पृश्याच्या मनाची वाढ कधींहि पूर्ण होत नाहीं. आणि ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य या तीन धूर्तांनीं 'तूं हलकटच, तूं हलकटच' असें वारंवार म्हटल्यानें त्याला खरोखरीच असा वहीम येतो कीं, आपण हलकटच आहों! असल्या मनोदास्यांतून त्याची सुटका जो जो करील तो तो त्या अस्पृश्याचा उपकारकर्ता. या हीन मनस्कतेच्या जोडीला मागील भागांत सांगितलेली धंद्यांची नागवणूक आणून बसवा, म्हणजे महार लोक ख्रिस्ती कां होतात याचीं कारणें एकदम कळतील.

ख्रिस्ती मिशनरी आपले मठ स्थापीत सुटला म्हणजे सहाजिकच मोठें वैषम्य वाटतें. अज्ञानाचा खच जेथें जास्त आणि दुष्काळाची कृपाहि जेथें जाडी, तेथें मिशनऱ्यांच्या कामांचा झपाटा फार. पण भाकरी मिळेनाशी झाली आणि मनाला विशेषसा मागचा ओढा नसला म्हणजे धर्मांतर करण्याकडे प्रवृत्ति व्हावी यांत काय नवल? एक वर्ष पाऊस पडला नाहीं कीं अन्नान्नदशा व्हावी या गोष्टीचें श्रेय अर्थात् आपल्या दयाळू राज्यकर्त्यांकडून हिसकून घेण्याचा कोणाचा अधिकार असणार? पण स्वराज्याचा अभाव हें एक महाकारण प्रत्येक ठिकाणीं सांगून सुटका करून घेणें इष्ट नाहीं आणि आपण सर्वत्र तसें करीतहि नाहीं. दुष्काळ पडल्याबरोबर आमचे शंकराचार्य जर दुष्काळाच्या प्रांतीं गेले, घरोघर हिंडले, वर्गण्या, देणग्या, पुड्या, एकत्र करून धर्मरक्षणाला सरसावले तर ख्रिस्ती मिशनऱ्यांचा पाड काय लागला आहे? त्यांचे प्रयत्न कुंठित करण्याला आपले प्रयत्न काय होत आहेत? आपल्या दरिद्रीपणामुळें ज्या प्रमाणावर हे प्रयत्न व्हावयास पाहिजेत त्या प्रमाणावर व्हावयाचे नाहींत हें उघड आहे. पण अल्पस्वल्पावरून सुद्धां आपली जागरूकता

व हेतु हीं सिद्ध होतील, हें निर्विवाद आहे. संकटाच्या प्रसंगीं जर वांचवावयास जावयाचें नाहीं तर मग केव्हां? सबंध हिंदुस्तानांत प्रतिवर्षी सवा लाख हिंदू ख्रिस्ती होतात असा हिशेब आहे, पण दक्षिणहिंदुस्तानांत ख्रिस्ती करण्याचा तडाखा फार यशस्वी होत असतो. आपल्याकडे अगदीं सर्कतवांटणीनें जरी प्रमाण आलें नाहीं. तरी गांवोगांव जे ख्रिस्त्यांचे मठ दिसतात ते निचेष्ट आहेत असें कधींहि मानतां यावयाचें नाहीं. त्यांचें पोखरणें चालूच असतें. नगर जिल्ह्याकडे जाऊन पाहावें म्हणजे पसरत चाललेल्या धर्मांतराची बाब नीट ध्यानांत येईल. कांहीं थोड्याच वर्षांत दुष्काळांच्या मेहरबानीनें आणि आमच्या उपेक्षेनें सध्या लाखांनीं मोजतां येण्यासारखी ख्रिस्ती प्रजा कोटीवर खास जाईल. इंग्लंड व अमेरिका इकडचे पाद्री लोक कोट्यवधि रुपयांचा फंड उभारून हिंदुस्तानांत येणार असून खेड्यापाड्यांतून सुद्धां आपल्या शाळा, मठ, दवाखाने सुरू करणार आहेत अशी बातमी एक वर्षापूर्वीं वाचल्याचें वाचकांना स्मरत असेल. ही गोष्ट अशक्य नाहीं. शिसारी येण्याइतकी संपत्ति कांहीं ऐद्यांच्या हातीं तिकडे जमा होत असते; ती धर्मकृत्यांत खर्चावयास ते केव्हांहि तत्परच असणार. आणि ही ख्रिस्ती भिक्षुकांची स्वारी ख्रिस्ती राजाच्या आश्रयाखालीं एकदां का सुरू झाली म्हणजे दोन ठिकाणीं विभागलेला हा हिंदुस्थान देश एकंदर तीन ठिकाणीं फाटणार असा त्याचा सरळ अर्थ होईल. एक कोटि ख्रिस्ती प्रजा म्हणजे एक मोठा जबरदस्त लोढणा होऊन बसणार आहे. धर्माचा समानपणा हा पुष्कळदां एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेलाहि मागें टाकतो हें डोळे उघडून पाहणारास सहज दिसण्यासारखें आहे. मनानें या ख्रिस्ती लोकांचा ओढा ख्रिस्ती राज्यकर्त्यांकडे राहीलच राहील; व राहत नाहींसा दिसला तर हरहुन्नर करून राज्य टिकवूं पाहणारा अधिकारी आपल्या हातांतील

शेंकडों उपकारांचा वर्षाव त्यांच्यावर करून हा ओढा उत्पन्न करील इतपत पराक्रम त्यांच्या अंगीं खास आहे.

आतां हे सगळे झालेले व होतकरू ख्रिस्ती आपल्याकडे तरी बव्हंशीं अस्पृश्य वर्गांतलेच आहेत यांत शंका नाहीं. इतर जातींतलीं सावजें पाद्री लोकांना थोडीं गबसतात, कारण त्यांना धर्मज्ञान आहे; पूर्वीचा इतिहास आणि संस्कृति यांचें बंधन आहे; आणि दुष्काळाच्या पहिल्या ढांगेंतच ते आक्रमिले जात नाहींत. अस्पृश्यांचें असें नाहीं. सगळा काच त्याला एकदम उत्पन्न होतो आणि जवळ घेणारा स्वकीय कोणी नाहीं अशी स्थिति असते. पाद्री उपकार करतो ते ठळक डोळ्यांत भरण्यासारखे आणि अंगीं लागण्यासारखेच असतात. तो कुडतीं देतो; अन्न देतो; औषध देतो; अमेरिकेंतून येऊन महिना दहावीस हजारांचा गल्ला गोळा करतां येण्यासारखी, अश्विनीकुमारांना लाजविणारी विद्या अंगीं असतां पोटापुरतेंच घेऊन सहस्रावधि व्याधिग्रस्तांची पीडा दूर करतो, आणि त्यांना पुनः बायकापोरांत आणून सोडतो. असा माणूस ज्या धर्माचा उपदेश करील त्यापासून सुद्धां परावृत्त राहात्रें असा पीळ बहिष्कृताला कसा राहील ! आमच्या येथें पहा ! तापाच्या साथीमध्यें आचार्यांनीं पुढें होऊन शहरांतले डाक्टर वैद्य गोळा करून कांहीं सामुदायिक यत्न केला तर काय होणार नाहीं? पण त्यांच्या म्हणजे डाक्टर वैद्यांच्या धर्मबुद्धीला धर्मगुरु हटकीतच नाहींत. अर्थात् सांथी ह्मणजे प्रत्यक्ष वैदूंची सुद्धां पोळी पिकण्याची हुल्लड बनून जाते. अशा अनास्थेमुळें आमच्या धर्मांत वजाबाकी झपाट्यानें चालू आहे. ही जों जों अशीच चालत राहील तों तों हिंदुस्थानांत एक निराळा गट उत्पन्न होत आहेसें समजावें. कितीही माना वांकड्या करून राष्ट्रभाव आळविला तरी राष्ट्राच्या चतुःसीमेच्या टोपणाहून विशाल असें हें धर्माचें टोपण आहेसें कबूल करावें लागेल. मुसल-

मानाला युरोपांतून झोडपून बाहेर काढण्याची खिस्त्यांची उत्सुकता आणि राजकारस्थानी मुत्सद्यांची तिला संमति या गोष्टी जर एकादी जाणीव मनांत आणून कोंबीत असल्या तर ती हीच कीं, अजून तरी राष्ट्रभावनेपेक्षां धर्मभावना अधिक शिरजोर ठरण्याचा काळ गेला नाहीं. तेव्हां शहाण्याहून शहाणे होण्याची हौस न बाळगलेली बरी. अस्पृश्य लोकांना आपल्या उपेक्षेनें आपण जाणूनबूजून पाद्री लोकांच्या तावडींत देत आहोंत व घरच्या घरीं एक नवीन तिढा उत्पन्न करीत आहोंत. आपल्या संस्कृतीचीं रक्षक होण्यासारखी प्रजा फुकाफुकी गमावणें हें पढत मूर्खाचें लक्षण आहे. पण तो अस्पृश्य तरी आमच्या संस्कृतीचा रक्षक केव्हां बनेल? जेव्हां त्याला तिच्या कक्षेंत घ्याल तेव्हां! तिचे सर्व तऱ्हेचे फायदे त्याच्या वांट्याला येतील तेव्हां. त्याला जर तुम्ही संस्कृत केलें नाहीं तर तो वाटेल त्या नव्या मताला मिळणार आणि वाटेल त्याच्या गोड हाकेला ‘ ओ ’ ह्मणणार.

असो. ही आपत्ति लक्षांत घेऊन या लोकांना खिस्ती न होऊं देणें जसें जरूर आहे तसेंच धर्मांतर केलेल्यांना परत आपल्याकडे घेण्याचें प्रयत्न होणें जरूर आहे. ‘ मी खिती होणार ’ जसें अवमानानें त्रस्त झालेला अस्पृश्य म्हणाला तर कांहीं लोक उदासीन अवाजानें ‘ जा हो जा ’ असें म्हणतात. पण यांत जितका त्रागा दिसतो तितकी काळजी दिसत नाहीं. शक्य ते सर्व प्रयत्न त्याला ठेवून घेण्यासाठीं केले आणि मग जर तो आडमुठेपणानें ‘ खिस्ती होणार ’ असें म्हणूं लागला तर त्या वेळची ही भाषा आहे. आधींची नाहीं. पण अस्पृश्य इतका आडमुठा नाहीं. नाहीं नाहीं म्हटलें तरी अगदीं झिरझिरीत का होईना पण त्याच्या समाजावर हिंदुत्वाचेंच पांघरुण आहे. तेंच जर जास्त उबदार झालें तर त्याला काय नको आहे? तो आपल्यांतच वागत आलेला नाहीं? तर तसा प्रयत्न

करावा आणि मग रागवावें. असो. जे आधींच ख्रिस्ती झाले आहेत त्यांना परत आणणें जरूर आहे आणि अशा तऱ्हेचा प्रयत्न जरी धर्मगुरुंनीं केला नाहीं तरी कै. वैद्यांनीं केलेला आपणा सर्वांना माहीत आहे, व त्यांच्या बंधूंनींहि तो चालू ठेवला आहे. हा प्रयत्नहि पूर्ण यशस्वी होण्यास अस्पृश्यतानिवारणाची जरूर आहे. कारण ख्रिस्ती झालेल्या महाराला आपण स्पृश्य कोटींत आलों आहों, इतरांशीं हस्तांदोलनाला योग्य झालों आहों ही जाणीव उत्पन्न झालेली असते. पण पुन: जर हिंदुत्वांत गेलों तर संस्कृतीच्या कुंचलीनें माझें कपाळ पुसून काढतील आणि अस्पृश्य छाप वाचून हा अस्पृश्य रे अस्पृश्य म्हणून पुन: येरे माझ्या मागल्या करावयास लोक चुकावयाचे नाहींत, असा वहिम त्याला येत राहील यांत शंका नाहीं. तेव्हां त्याला परत बोलवितांना त्याच्या मनांतील या बारीक शंकेला जागा उरूं देतां कामा नये. त्याला आपण हिंदुसमाजांतले अधिकृत घटक आहों अशी भावना उत्पन्न होईसें दिलदारपणा आपण दाखविलें पाहिजे. धर्मापासून प्राप्त होणारें नैतिक फायदे आपण त्याला मिळूं दिले पाहिजेत. कोणी कोणी असें समाधान सांगतात कीं, ते घाणेरडे असतात तेव्हां त्यांना धर्ममंदिरांत कसें घ्यावें ? वास्तविक पाहतां ही गोष्ट स्वच्छतेच्या मुद्यावरच अडली आहे असें वाटत नाहीं पण तसें जर खरोखरच असेल तर धर्मगुरूंनीं तसें सांगावें कीं, अमुक एका डिग्रीची स्वच्छता असली तर तुम्हांस आंत घेऊं. गोव्याकडील अगदीं घाणेऱ्या व केवळ 'लंगोटी व पंखा' च नेहमीं घालणाऱ्या ख्रिस्ती कामाठ्याला सुद्धां स्वच्छ होऊन डगलापट्टा घालून चर्चमध्यें जातां येतें. तसें आचार्यांनीं यांना सांगावें कीं, तुम्हास आंत घेण्यास तुमच्या घाणेरडेपणाखेरीज दुसरा कोणताहि प्रत्यवाय नाहीं. असें धर्मगुरु म्हणावयास कबूल आहेत का पहा आणि मग स्वच्छतेचा मुद्दा पुढें आणा. मुसलमान किंवा ख्रिस्ती निदान देवळाच्या प्राकारांत

जेथपर्यंत येऊं शकतो तेथपर्यंतहि अस्पृश्य येऊं शकत नाहीं, असें म्हटलें म्हणजे राज्यकर्ते विष्णूचेच अवतार असतात असें म्हणावयाचें. पुजारी जेव्हां एकाद्या साहेबाला ही मूर्ति अशी आहे आणि ती तशी आहे असें माना हालवून सांगावयास लागतो तेव्हां त्याला या उत्तराशिवाय दुसरें न सुचणेंच रास्त आहे. पण हे असले लोक आपलें दास्य लपविण्यासाठीं तत्त्वज्ञानाची फरपट काढतात आणि दास्य चिरंतन करतात येवढाच या उत्तराचा अर्थ आहे. जो कोणी मानगुटीस बसेल तो विष्णू अवतार ! असलीं उत्तरें मिळतात म्हणून त्यांचा उल्लेख करावासा वाटतो इतकेंच, बाकी त्यांची किंमत काय आहे हे कोणालाहि कळण्यासारखें आहे.

असो; याप्रमाणें राजकारण, समाजकारण, आणि धर्मकारण या तीनहि ठिकाणीं अस्पृश्यांच्या काय काय तक्रारी आहेत त्या आतां-पर्यंत दिग्दर्शनरूप थोडयांत मांडिल्या आहेत. राजकारणांत देशा-भिमानाला सबळ कारण नाहीं, समाजकारणांत खडखडीत बहिष्कार असून सुखाची वाटणी नाहीं आणि धर्मकारणांत त्याच बहिष्काराची परमावधि असून ज्ञान व शांति यांचा लाभ नाहीं. अशी ही तक्रार थोडक्यांत आहे. आतां हिंदुसमाजातर्फे काय म्हणतां येण्यासारखें आहे, महाराची दृष्टि कशी असावयास पाहिजे या संबंधीं काय म्हणतां येतें तें पाहू.

सध्यां पृथ्वीवर निरनिराळ्या ठिकाणीं पांढऱ्या रंगाचे लोक इतर वर्णीयांच्या बाबतींत जसा आचार करीत आहेत तशाच प्रकारचा आचार त्रैवर्णिक आर्यांनीं फार पुरातन काळीं मूळ एतद्देशीय लोकांच्या बाबतींत केला. सुपीक प्रदेश आपल्या ताब्यांत घ्यावेत, हरतऱ्हेच्या संपत्ति तेथें उत्पन्न कराव्या, आपण भोगाव्या व थोडा बाईटपणा पदरीं आला तरी तो पतकरून आपल्या पुढील प्रजांच्या उपभोगासाठीं मोठ्या दक्षतेनें त्या जपून ठेवाव्या, अन्य वर्णीयांशीं

लग्नसंबंध करूं नयेत, इतकेंच काय पण त्यांचा शेजारधर्महि योग्य मानूं नये, प्रसंग पडल्यास त्यांना शासन करावें आणि त्यांनीं नमतें घ्यावयाचें मनांत आणल्यास फार झालें तर आपल्या सेवाचाकरीची जबाबदारी त्यांजवर सोंपवावी, पण इतर सामाजिक आणि राजकीय हक्क व सवलती, संस्कृतीचा समानपणा स्थापीत न करतील इतक्या प्रमाणांत द्याव्यात, असा वर्तनक्रम हल्लींच्या मोठमोठ्या वसाहती अंगिकारीत आहेत. प्राचीन आर्यांनीं हीच गोष्ट केली. ज्या जमातींनीं सारखें खडाष्टकच टेविलें त्यांना सरसकट झोडपीत नेऊन कोठें तरी मोठाल्या अरण्यांत अगर पहाडांत नेऊन घातलें. जे कोणी अधिक जुळतें घेतातसें दिसलें त्यांना आपल्या सामाजिक जुळणींत गुंतवून टाकलें. त्यांना संपत्ति व वैभव हीं प्राप्त करून घेण्याच्या ज्या कांहीं मर्यादा होत्या त्यांच्या आंत घेतलें नाहीं. पण आपली सेवाचाकरीही व्हावी आणि त्यांनाहि चंदीचारा मिळावा अशा तऱ्हेचा कांहींसा सलोखा केला. ही गोष्ट ‘ ग्राम ’ ही संस्थ नीट पहावी म्हणजे ध्यानांत येईल. हल्लींचीं वाहतुकीचीं साधनें उत्पन्न होण्याच्या आधीं व भाकरीच्या शोधार्थ दाही दिशा येरझारा करणें भाग पडण्यापूर्वीं प्रत्येक गांव म्हणजे स्वतःपुरता पूर्ण असा एक सुटा घटक असे. त्यांतील नारूकारूंची व इतर धंदेविशिष्ट जातींची व्यवस्थाही एका बुद्धिपुरस्सर केलेल्या योजनेची दर्शक असे. जसे इतर धंदेवाले तसे या योजनेंत महार, मांग, ढोर, चांभार हे लोक बहुतकरून सांपडावयाचेच. जे लोक त्यांच्याशीं सर्वथैव फटकून राहिले आणि मग ढळढळीत गुन्हेगार जातींत मोडूं लागले ते आपल्याला गांवगन्ना दिसावयाचे नाहींत; पण वर लिहिलेल्या जातींपैकीं बहुतेक प्रत्येक जात समाजाच्या घटनेंत कायमची गुंतून गेलेली दिसेल. ‘ गांव तेथें महारवाडा ’ या म्हणींचा इतर कांहीं

उपयोग असला तरी प्रत्येक गांवांत महारवाडा असतोच असतो हा वाच्यार्थ तीवरून स्पष्ट होतो.

सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, कोळा, भिल्ल, गोंड इत्यादिकांप्रमाणें सुसंस्कृत आर्यांपासून फाटून न राहतां या जाती राष्ट्रीय जीविताच्या दृष्टीनें आर्यांशीं इतरांपेक्षां अधिक जवळ आल्या आणि कोणता का दर्जा होईना, पण तो पतकरून त्यांनीं जेत्या लोकांशीं एक तऱ्हेचें लागतेंपण उत्पन्न केलें हें निःसंशय आहे. त्यांच्या वृत्तीची सोयही आर्यांनीं खास केली होती. महार लोकांचे एकंदर ५२ हक्क आहेत असें त्यांच्यांतील माहितगार ह्मणतात. या हक्कांपैकीं कांहींचा उल्लेख करून त्यांचा नीतिदृष्ट्या विचार पुढें करीन. सध्या इतकेंच लक्षांत ठेवावयाचें कीं, चरितार्थाचें हटकून साधन असें महारांच्या पदरीं कांहीं तरी एक होतेंच होतें. पण रंगद्वेषाचा प्रभाव सद्यःकालीं जसा दृष्टीस पडतो त्यापेक्षां कमी वाईट पूर्वीच्या काळीं होता असें ह्मणवत नाहीं. " आमच्याशीं लढावयाचें असेल तर लढा आणि मरून जा. फटकून राहावयाचें असेल तर आमच्यापासून स्पष्टपणें पृथक् राहा. आमच्या शेजारास यावें असें ह्मणणें असेल तर या, आह्मांसही नोकर चाकर हवेतच आहेत, तुम्हांला पोटभर खावयास देऊं पण एवढें मात्र खडखडीत ध्यानांत ठेवा कीं, आमच्याशीं बरोबरीचें नातें आम्ही तुम्हांस केव्हांहि लावूं देणार नाहीं, आणि वैभवाचे वांटेकरीहि होऊं देणार नाहीं " हा वरचढ संस्कृतीच्या लोकांचा खालच्या लोकांना नेहमींचा रोकडा जबाब आहे. पण वाईटांत चांगलें इतकेंच कीं, सबंध जमातीच्या जमाती जिवंत राहूं शकल्या. ही कांहीं सामान्य महत्वाची गोष्ट नव्हे. जेथें वंशाच्या वंश हळूहळू अल्पसंख्य होत होत कायमचे लुप्त व्हावयाचे तेथें जिवानिशीं राहतां आलें हा कांहीं सामान्य फायदा नव्हे. अनेक मानववंशांच्या चाललेल्या झटापटींत आणि त्यांच्या हितसंबंधांच्या

गल्लतींत कोणा लोकांचें भाग्य कसें उदयास येईल हें खरोखरच अतर्क्य आहे ! सध्याचा मनु तरी असा दिसतो कीं, सहस्रावधि वर्षे लोकांच्या सुखाकडे आणि वैभवाकडे केवळ दुरून पाहत बसावें आणि आपण व आपलीं मुलेंलेकरें यांनीं जन्मापासून मृत्यूपर्यंत अवमान आणि लाचारवृत्ति यांच्या घाणेऱ्या चिखलांत रुतलेले राहावें, अशा या दास्याच्या अवस्थेंतन या मांगमहारादींचा उद्धार व्हावा. ही भाग्योदयाची वेळ ज्या त्रैवर्णिकांच्या विरोधसंगतींत त्यांना लाधली त्या त्रैवर्णिकांचे, इतिहासाच्या मोठ्या दृष्टीनें, अस्पृश्यांनीं आभारच मानले पाहिजेत. मी या ठिकाणीं भिन्न भिन्न मानववंशांच्या ज्या हालचाली आणि घडामोडी भूपृष्ठावर चालतात त्यांचा हिशेब म्हणून उंच भूमिकेवरून लिहीत आहें; अगदीं आजच्या वादाला या किंवा त्या पक्षाला जमवून घेण्यासाठीं लिहीत नाहीं. या मुद्याचें विवेचन शांतपणें वाचणें स्वाभिमान बळावलेल्या महारसुशिक्षितांस अशक्य आहे हें मी जाणून आहें. पण हा भूतकालीन गोष्टींचा आढावा आहे आणि त्या दृष्टीनें त्याची किंमत ठरवावयाची आहे.

दुसरें असें कीं, ज्या त्रैवर्णिकांवर अस्पृश्यांनीं कहर केला त्याच त्रैवर्णिकांत भागवतधर्माचा संप्रदाय थेट महारवाड्यांत नेऊन पोंचवणारे विशाल अंतःकरणाचे संत—महंत उत्पन्न झाले. सर्व धर्मज्ञान अवघड संस्कृतांत आणि “ दूर उभा राहा ” असें म्हणणाऱ्या गुरुजींच्या मुखीं असा प्रकार होता. पण महाराष्ट्रसंतांनीं “ संस्कृतातेंहि पैजा जिंके ” अशा मराठी भाषेंत आणि सर्वांना मनमुराद लाभेल अशा बालबोध पद्धतीनें तें देशभर खैरातून टाकलें. इतकें कीं, जातोजात संत पैदा झाले आणि सामाजिक दृष्ट्या दूर ठेवलेल्यांनाहि संत म्हणून मान मिळूं लागला. त्याचा अर्थ असा कीं, अस्पृश्य जातींना अभिमान वाटेशी एकेक विभूति त्यांच्यांत उत्पन्न झाली. चोखामेळा

आणि रोहिदास याच पवित्र पुरातन नांवांभोंवतीं त्या त्या जातीचे लोक गोळा होत आहेत. ज्या जातींना इतिहास, सामाजिक दर्जा आणि धर्मज्ञान यांचा पाठपुरावा आहे त्यांच्या विभूति या तीनहि प्रदेशांत सांपडतात. पण महार–चांभारांना या गोष्टी लाभल्या नाहींत. त्यांना भागवतधर्माचें एकच ठिकाण गुणोत्कर्षाला मिळालें आणि त्या ठिकाणी त्यांना विभूति प्राप्त झाल्या. पण हें ठिकाण मिळवून देण्याचें काम त्रैवर्णिक संतांनीं केलें हें विसरतां कामा नये. आपला भूतकाळ म्हणजे कोरा कागद आहे असेंच महार–चांभारांनीं वाटूं देऊं नये. 'सर्व गोष्टींचा परित्याग करून मला शरण ये' म्हणणाऱ्याच्या राज्यांतील अमीर–उमराव त्यांच्या पूर्वकालांत होऊन गेलेले आहेत आणि ही परिस्थिति पूर्वग्रह झिंजाडून देऊन दीनांना जवळ करणाऱ्या संतांनीं उत्पन्न केली ही गोष्ट अस्पृश्य व तदितर यांनीं अवश्य ध्यानांत ठेवावी.

शिवाय त्रैवर्णिकांच्या दुसऱ्या एका चळवळीचा फायदा अस्पृश्यांना आपोआपच मिळणार आहे. प्रस्तुतच्या राजकीय चळवळीचे कष्ट खरोखर त्रैवर्णिकच करीत आहेत. मनानें, बुद्धीनें व शरीरानें जे जें कांहीं करणें जरूर आहे तें तें सर्व अस्पृश्येतर लोकच करीत आहेत कोणी कोणत्याहि मताचा असो, त्याच्या प्रयत्नाचा रोख स्वराज्याचे हक्क संपादण्याकडे आहे हें उघड आहे. पण त्या मिळणाऱ्या भावी स्वराज्याचे फायदे त्रैवर्णिकच घेणार आहेत असा कोणी लटका समज करून घेऊं नये. देशांत कारखाने व उद्योगधंदे सुरू झाले व भाकरी स्वस्त झाली तर ती म्हणजे केवळ त्रैवर्णिकांनाच होणार आहे असें मानण्यांत वादांतली आढी आणि पीळ दिसेल, पण त्याबरोबरच यथातथ्य ज्ञानाचा जाणूनबुजून केलेला विपर्यासहि दिसेल. एवढी इंग्रजसरकारच्या राज्याची प्रचंड दगडबंद इमारत पण तीहि गदगदां हालविण्यास देशभक्तांनीं कमी केलें नाहीं; इतकी

कीं, रखवालदार भय्या कांहींसा घाबरल्यासारखा सुद्धां दिसतो ! हे सर्व पराक्रम हिंदूंपैकीं अस्पृश्येतरांनींच केलेले आहेत. या पराक्रमाचे वांटेकरी होण्याइतपत परिस्थिति त्यांना इतरांनीं अनुकूल ठेविली असती तर अस्पृश्यांनींहि कांहीं कार्यभार शिरावर घेतला असता यांत संशय नाहीं. पण आपला प्रस्तुतचा मुद्दा इतकाच आहे कीं, अस्पृश्यांचीं तदितरांशीं कसल्या प्रकारचीं नातीं आहेत हें पहावें. अस्पृश्यांची कड घेऊन जें काय यथामति लिहितां येण्यासारखें होतें तें थोडक्यांत पण स्वच्छपणें लिहिल्यावर इतर समाजाकडे कोणत्या लागेबांध्याच्या दृष्टीनें त्याला पाहतां येईल हें पाहण्याचा यत्न केला आहे. त्रैवार्णिक झगडत असले तरी त्या झगड्याकडे आपलेपणाची दृष्टी ठेवूनसुद्धां अस्पृश्यानें दक्ष राहिलें पाहिजे हें उघड आहे.

अस्पृश्यांनीं आपल्या वैगुण्यांकडेही नीट लक्ष पोंचविलें पाहिजे. उठल्यासुटल्या सरकाराला शिव्या देतांना थोडें आत्मनिरीक्षण करीत जा म्हणून जें गांधींनीं लोकांना बजाविलें तें अस्पृश्यांनीं आत्मशुद्धीच्या दृष्टीनें ध्यानांत ठेवावें. अस्पृश्यास्पृश्यांत बारीकसारीक किती तरी भेद आहेत. सर्व अस्पृश्यांचा मिळून एक गट्टा मानणें चूक आहे. इतरांकडून न शिवलें जाणें ही एकच काय ती बाब त्यांना सामान्य आहे. लग्नसंबंध तर दूरच राहो, पण त्यांच्या त्यांच्यांत अन्नोदकव्यवहारहि होत नाहींत. महार आपल्याला सर्वांहून श्रेष्ठ समजतो. कांहीं कांहीं ठिकाणीं महाराचा वरचष्मा उगाच आहे असें चांभार समजतात, पण स्वतःला मात्र ते ढोराहून वरचे धरतात. मांग हा एकादे वेळीं महारापेक्षां कमी असल्याची कबुली जरा कुरकुरतच देतो. गुरें ओढणें, तीं फाडणें, कातडीं धुणें, कमावणें, जोडे शिवणें इत्यादि धंद्यांचें कमीअधिक महत्त्व, स्वच्छतेचें मान, तसेंच मेलेल्या गुरांच्या मांसाचा खाण्याकडे उपयोग करणें न करणें या बाबी लक्षांत घेतल्या म्हणजे या निरनिराळ्या लोकांच्या उच्चनीचपणाचा हिशेब

कोणालाहि सहज करतां येण्यासारखा आहे. पण पुष्कळदां हा हिशेब चुकेल. खजिन्याची बिनबोभाट ने-आण करून राजपुरुषांच्या विश्वासास पात्र झालेला, गांवकीच्या दरबारांत पाटील-कुळकर्ण्याच्या खालोखाल मान सांगणारा आणि क्वचित् रणमैदानाचीहि हवा पाहिलेला महार सहजच आपल्याला चांभारापेक्षां श्रेष्ठ समजतो. पण सर्वच चांभार हे त्याचें श्रेष्ठत्व कबूल करणार नाहींत. स्वच्छतेच्या दृष्टीनें दोऱ्या वळणारा मांग इतरांहून श्रेष्ठ असावा, पण तो “ भाजी ” खाणारा असल्यामुळें कमी समजला जातो. महाराच्या देवळाच्या आवारांत सुद्धां मांग येऊं शकत नाहीं. आणि चमत्कारिक वाटेल पण परटापेक्षां आपल्याला श्रेष्ठ मानणारे महार कोठें कोठें भेटतील! शहरांत दारूचें व्यसन या लोकांना अतिशय असतें. आणि महार दारुड्याची दारू न पिण्याबद्दल केलेली आर्जवें फार वाया जातात अशी व्हॉलंटिअर्सची तक्रार आहे. शहरांत पानस्वातंत्र्य फार; तसेंच सिनेमांतील उघडींनागडीं चित्रें पाहावयाचा नादहि मोठा; आणि श्रीमंतांनीं आणि खावंदांनीं खेळावयाच्या रेसेच्या हैदोसाची चटकहि मोठी. या गोष्टींनीं शहरांतील अस्पृश्यांच्या मनाची धुळधाण उडवून दिली असते. कांहीं कांहीं खेडेगांवचे मांग व रामोशी चोऱ्यादरवड्याबद्दल मुलुखभर कीर्ति कमवून राहिले आहेत ! अशी जरी हकीकत असली तरी शुद्धीवर राहिलेले अस्पृश्य कांहीं थोडे नाहींत. आपली स्थिति, आपली आपत्ति पाहून खेद आणि दुःख यांनीं भरून गेलेले अस्पृश्य आपल्याला पुष्कळ भेटतील. शहरांत जागेची फार जिगजीग असल्यामुळे स्वच्छतेचें मान पाहिजे असून सुद्धां पुरेसें ठेवतां येत नाहीं. खेडेगांवची हीच प्रजा पाहिली म्हणजे आनंद होतो. घरें स्वच्छ, माणसें चालीरीतीचीं आणि क्वचित् भारदस्तहि दृष्टीस पडतील. त्यांना पाहून अस्पृश्यतानिवारणाची जरूरी कां आहे हें मनांत अधिक ठसतें, आणि समाजानें मनांत आणलें

तर वाटतो तितका हा प्रश्न अवघड नाहींसेंहि क्षणभर वाटतें. असो. वर जीं वैगुण्यें म्हणून दाखविलीं आहेत त्यांचा अस्पृश्यांनीं नीट विचार करावा. आपल्याला वाईट म्हणणाऱ्याचा राग यावा हें साहजिक आहे तसा तो आला तरी चालेल, पण त्यांनीं कामाला लागावें. अस्पृश्यता घालविण्यासाठीं जे कांहीं यत्न होत आहेत व होतील त्यांना अनुकूल भूमि तयार करणें हें ज्यांच्या कपाळीं ती आजवर लिहिली आहे त्यांचेंच मुख्य कर्तव्य आहे. हें करीत असतांना इतर समाजांशीं असलेलें आपलें अंतर ज्या कृत्यानें वाढेल असें कोणतेंहि कृत्य करण्याच्या मोहास अस्पृश्यांनीं बळी पडूं नये. यांत त्यांचें खरें हित आहे.

या पुढें अस्पृश्यांपैकीं मुख्य जातींच्या उत्पत्तीची, चालीरीतींची व धंद्याविषयींची थोडीशी माहिती द्यावयाची आहे. अस्पृश्य जातींच्या उत्पत्तीविषयीं मागें एके ठिकाणीं उल्लेख आलेला आहे. परंतु त्या वेळचें ' प्रस्तुत ' निराळें असल्यामुळें त्यांच्या उत्पत्तीच्या केवळ उल्लेखापलीकडे विशेष कांहीं लिहिलें नाहीं; असो. महार, मांग, ढोर, चांभार, व रामोशी या जातींविषयींच लिहावयाचें आहे, कारण मुख्य अस्पृश्य जाति याच होत. निरनिराळ्या जमातींची कितीहि गल्लत झाली असली तरी व्यक्तिव्यक्तीच्या नाकाडोक्याच्या आकारांवरून, ती कोणत्या मानववंशांत हटकून जाऊन पडते, हें आम्ही सांगूं शकतों असें म्हणणाऱ्या आधुनिक शास्त्रांचा असा अभिप्राय आहे कीं, अस्पृश्यांपैकीं बहुतेक जाति अनार्य आहेत. सिंधूपासून गंगेपर्यंत सर्व नद्यांच्या कांठच्या समृद्धीवर उत्तम जोगावलेले आणि विजयाची वेदकालीन ईर्ष्या अंगीं पुरी बाळगून असलेले युयुत्सु जसजसे खालीं खालीं उतरूं लागले, तसतसे त्यांच्या उग्र दर्पामुळें आणि स्वसंरक्षणाच्या सहज इच्छेमुळें हे अनार्य लोक हटूं लागून दऱ्याखोऱ्यांच्या आश्रयाला गेले असावेत असें अनुमान

आहे. आर्य तर विशाल मनाचे आणि साधनसंपन्न; त्यांच्यापुढें यांनीं कसें टिकावें ? जों जों सासुरवास जास्त होऊं लागला आणि जीवितच संशयांत सांपडूं लागलें, तों तों हे पहाडी मुलूख आणि निबिड अरण्यें यांत वस्ती करूं लागले व पुढें या नवीन जोमदार लोकांनीं कसलाहि पसारा मुलूखभर पसरला तरी त्याकडे दुर्लक्ष करून आपलें स्वतंत्र जिणें संभाळून राहिले. भिल्ल, कोळी, गोंड इत्यादि लोकांविषयीं केलेलें हें अनुमान पायाशुद्ध आहे असें म्हणवत नाहीं. कारण आर्यांचा उपसर्ग पोंचण्याच्या आधीं हे जमीन कसून आपला उदरनिर्वाह करीत असत असें जेव्हां इतर पुराव्यांवरून सिद्ध होईल तेव्हांच हें अनुमान खरें मानतां येईल. नाहीं तर जेथें जेथें रानटी लोक सांपडतील तेथें तेथें ते शेजारच्या सुधारलेल्या लोकांकडून हांकलले गेले असा सिद्धांत फलित व्हावयाचा. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, वरील जातींचे लोक आर्यांच्या उपद्रवामुळें नाहीं, तर आधींपासूनच रानवट व डोंगरकरी असण्याचा संभव आहे.

असो. हें अनुमान खरें असलें तरी प्रस्तुत लेखांतील विषयभूत जातींच्या कुलपरंपरेचा त्यांत खुलासा होत नाहीं. पण महार, मांग इत्यादि लोकांविषयींहि आधुनिक शास्त्रांचा असाच सिद्धांत आहे कीं, हे लोक अनार्यच होत अर्थात् आर्यांच्या वसाहती आपल्या प्रांतांत फैलावण्याच्या पूर्वींपासूनहि हे लोक सपाट मैदानांत राहत असत, व जमीन कसून आपला उदरनिर्वाह करीत. जमिनीचे मालक तेच होते, व आर्यांकडून जिंकले गेल्यानंतर त्यांना उपरेपणा प्राप्त झाला. कोणी म्हणतात, ह्या जाति द्रविडियन मानववंशापैकीं आहेत. कसेंहि असो, ते आर्यवंशीय नव्हेत, याविषयीं सर्वांचें एकमत आहे. आपल्या जुन्या शास्त्रकारांच्या जातकुळी देण्याच्या पद्धतीनें पाहिलें असतां हे लोक संकर जातींपैकीं आहेत.

पण ही प्रतिलोम प्रजा संख्येनें इतकी अफाट केव्हां व कशी झाली हें त्या पद्धतीवरून नीट कळत नाहीं. ह्या पद्धतींत श्रेष्ठ—कनिष्ठ जातींच्या गुणाकाराची नुसतीं कोष्टकें आहेत. अमुक जात कशी झाली असें विचारतांच, एका ठराविक कोष्टकावर बोट ठेवावयाचें व तिची जातकुळी त्या कोष्टकांत दिलेल्या श्रेष्ठ—कनिष्ठ जातीच्या नांवाशीं भिडवावयाची असा हा प्रघात आहे. शास्त्राविषयीं आदर असून सुद्धां ह्या पद्धतींतील शास्त्रीयता न पटेशी व अविश्वास्य वाटते. शिवाय इतिहास आणि वर उल्लेखिलेलें शीर्षमापनाचें आधु-निक शास्त्र यांच्या जबानीनंतर तर आपली जुनी पद्धत अगदीं टाकाऊ वाटते. असो. आपलीं धर्मशास्त्रें व आधुनिक शास्त्रें यांना बाजूला ठेवून त्या त्या लोकांच्या आपापल्या उत्पत्तीविषयीं काय कल्पना आहेत हें पाहिलें तर निरनिराळे विचार मनांत उत्पन्न होतात. आणि अति दूरच्या भूतकाळांत दिसणाऱ्या अंधारांतील अस्पष्ट आकृतींवरून आर्यसंस्कृति, व आर्य येथें येण्याच्या आधीं चालू असलेली संस्कृति, यांचा परस्परांवर काय परिणाम झाला असेल याविषयीं अनेक अनुमानें मनांत उद्भवतात. स्वतःच्या उत्प-त्तीविषयींच्या त्यांच्या कल्पना जशा, तशा, त्यांच्या चालीरीती व धंदा याविषयींच्या हकीकतीहि मोठ्या बोधकारक आहेत म्हणून त्या होतां होई तों आटपशीरपणानें खालीं देतों.

रामोशी हे कांहीं ठिकाणीं अस्पृश्य समजले जातात व कांहीं ठिकाणीं स्पृश्य मानले जातात; कांहीं माहितगार रामोशांचें असें म्हणणें आहे कीं आपण कोठच अस्पृश्य समजलो जात नाहीं. त्यांचा संबंध जमीन कसणाऱ्या कुणबी लोकांशीं बराच येत असल्यामुळें व रखवालीचीं वगैरे कामें त्यांच्याकडेच असल्यामुळें शिवताशिवतीचा प्रसंग अर्था-तच जास्त पडतो. दाशरथी रामचंद्र दंडकारण्यांत असतांना आम्ही त्याची सेवा फार एकनिष्ठपणें केली, सीतादेवीला बंधमुक्त करून

इकडून परत जातांना, आमच्यापैकीं पुष्कळांना त्यानें अयोध्येस बरोबर नेलें, व आमचा विश्वासूपणा लक्षांत घेऊन आम्हांस रखवालीचें काम सांगितलें; त्यानें आम्हांवर बापासारखें प्रेम केलें व म्हणून आम्ही आमच्या जातीला ‘ रामवंशी ’ म्हणजे रामोशी असें नांव घेतलें असा स्वतःच्या पूर्वपीठिकेचा इतिहास रामोशी लोक सांगतात. इतक्या उंच नांवाशीं आपला संबंध घडून आल्यामुळें पुष्कळांनीं मांसाशनहि वर्ज केलें. त्यांना रामभक्त असें म्हणतात. महाराष्ट्र व कर्नाटक यांच्या हद्दीवरील बेरडांशीं यांचा पुष्कळच सारखवटपणा आहे व म्हणून या दोघांची कुलपरंपरा एकच असावी असें कांहींचें मत आहे. अर्थात् या उभयतांनाहि हें एककुलत्व पसंत नसेल. रामोश्यांचे बांदाड्टे, बेरड, हळणे, कडू, मांग इत्यादि पोटविभाग असून त्या प्रत्येकाचे पुनः चव्हाण व जाधव असे बारीक भाग आहेत. मराठा—कुणबिणीशीं लग्नें झाल्यामुळें कडू नांवाची जात, व मांगिणीशीं झाल्यामुळें मांग रामोशी ही जात उत्पन्न झाली असें म्हणतात. पूर्वींच्या राज्यांत यांच्याकडे किल्लेदाराचें काम असे. लग्नें वगैरे चालविण्यास देशस्थ ब्राह्मण कोठें कोठें जातो. इतर समारंभ व संस्कार जंगम लोकहि चालवितात. यांच्याच जातींतील गुरु “ गोसावी ” हे होत.

मांग लोकांचा मूळ पुरुष यमऋषि. त्याला सात मुलगे. पैकीं कर्कमुनीला दोन मुलगे झाले. यांपैकीं पहिल्यानें शंकराची गाय खाल्ली म्हणून त्याला, ‘ तूं महार हो ’ असा शंकरानें शाप दिला, व दुसऱ्यानें प्रत्यक्ष जरी खाल्ली नाहीं, तरी त्याच्या अंगावर त्या मेलेल्या गायीच्या रक्ताचा शिडकाव झालेला होता म्हणून त्याला ‘ तूं मांग हो ’ असा शाप दिला. असो. ह्या कथेचा अर्थ कांहीं असो. चेहरेपट्टी व रंग यांवरून हेहि आर्यांची वसाहत होण्याच्या पूर्वींचे येथील रहिवासी होते. महाराष्ट्र, कर्नाटक

व गुजराथ या तीनहि प्रांतांत यांची वस्ती आहे, पण रोटीबेटी-व्यवहार मात्र चालू नाहीं. ह्या लहानशा जातींचे सुद्धां बेटीव्यवहाराला बंद असे पंचवीस पोटविभाग आहेत. त्यांच्यापैकीं कांहीं आडनांवेंहि ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत—आपटे, भिसे, चव्हाण, धोंगडे, गाइकवाड, जाधव, जगताप, जोगदंड, कांबळे, लोंढे, मोहिते, मोरे, नांदे, पवार, साठे, शिंदे इत्यादि. यांचा मुख्य धंदा नाडे, चऱ्हाटें करण्याचा आहे.

ढोरांपैकीं बरेचसे लिंगायत आहेत. बुधलेकरी, बुंदेलखंडी, हिंदुस्थानी, कर्नाटकी, खेतरपुडी, लिंगायत इत्यादि पोटविभाग असून त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार बंद आहेत. यांच्यापैकींहि कांहीं आडनांवें मनोरंजक वाटतील—बोराडे, गाइकवाड, होळकर, इंगळे, कदम, मानकर, साळुंके, शिंदे इत्यादि. जितकीं आडनांवें तितकीं देवकें असून एकाच देवकांत लग्नसंबंध होत नाहींत. कातडें कमावणें हा त्यांचा मुख्य धंदा असून कमावलेल्या कातड्याच्या बाजारांत मांडण्यासारख्या चिजा तयार करणें हें कामहि कांहीं लोक करतात. यामध्यें पुष्कळजण वारकरी आहेत. त्यांच्या जातीचाच स्वतंत्र असा गुरु म्हटला म्हणजे "कानफाट्या गोसावी" हा आहे, व तो आपली वार्षिक दक्षिणा आपल्या शिष्यशाखेकडून नियमितपणें उकळतो.

आपला मूळ पुरुष एक शिवभक्त होता असें चांभारांचें म्हणणें आहे. कोणी कोणी हा मूळपुरुषत्वाचा अधिकार मार्कंडेय ऋषीला देतात व बाकीच्या अस्पृश्यांतच हे मोडत असल्यानें व बाकीचे अस्पृश्य अनार्य असल्यामुळें या लोकांनाहि सामान्यतः मूळ अनार्य प्रजेपासून उत्पन्न झालेल्या लोकांत मोडण्यांत येतें. पण हे लोक आर्य प्रजेपैकीं असावेत असें आधुनिक शोधकांचें म्हणणें आहे. रंगानें हे लोक बाकीच्या अस्पृश्यांपेक्षां उजळ असतात व त्यांच्या-

तील स्त्रियांना सुंदर वर्ण व रूपसंपदा हीं लक्षांत येण्याइतपत चांगलीं लाभलेलीं असतात. ही गोष्ट सर्वांना माहीत आहे. चर्मकाराचा धंदा अगदीं जुन्या वैदिक वाङ्मयांत व बुद्धपूर्व वाङ्मयांतहि उल्लेखिलेला आढळतो. त्या काळीं या धंद्याला फार मोठें महत्त्व प्राप्त झालें होतें. खुद्द राजे लोकांपाशींहि ओळख होण्याइतपत व संघट्टण घडण्याइतपत या धंद्यांतील पुढाऱ्यांना राजदरबारीं आणि समाजांत मान असे. पुढें अंगीं निष्प्रभता उत्पन्न करणारी बुद्धाची अहिंसा सगळीकडे पिकल्यावर जो तो असल्या धंद्यासंबंधानें खंती मानूं लागला, व तो धंदा करणारे लोक कमी प्रतीचे मानले जाऊं लागले. हळूहळू त्यांच्या विषयींचा तिटकारा वाढत जाऊन बाकीच्या अनार्यांप्रमाणें त्यांनाहि बहिष्कृत व्हावें लागलें. चांभार आर्यकुलोद्भव आहेत हें सिद्ध करण्यासाठीं पुढील गोष्टींचा निर्देश करण्यांत येतो. इतर अस्पृश्यांत जी नाहीं ती प्रेतें जाळण्याची चाल त्यांच्यांत आहे; तसेंच मृतांच्या अस्थि पवित्र नद्यांत टाकण्याची चालहि त्यांच्यांत आहे. शिवाय श्राद्धपक्ष करून हे लोक ब्राह्मणाला दक्षिणा देतात व गोमांस अत्यंत निंद्य समजतात. असो. एखादी जात अनार्य म्हटल्यानें ती अगदीं कुचकामाची ठरते असा कांहीं नियम नाहीं. पण शौर्य, पराक्रम, विद्याभिरुचि, कलाकौशल्याची वाढ, परमार्थज्ञान इत्यादि बाबतींत इतिहासाला आठवण नाहीं तेव्हांपासून तहत आतांपर्यंत ज्या आर्यवंशजांनीं अमर असा नांवलौकिक मिळविला त्यांपैकीं आपण आहोंत असें वाटून चांभाराच्या रक्ताला द्रुरूपानें उसळी मिळाली तर त्यांत काय नवल? एखाद्या जातीच्या उत्पत्तीच्या ज्या निरनिराळ्या उपपत्त्या अडाणी व कदाचित् लुच्च्या लोकांनीं बसविलेल्या असतात त्या सर्वांची एकवाक्यता कधींच घडून यावयाची नाहीं, व या उपपत्ति जों जों जुन्या तों तों त्यांच्याविषयीं शंकाकुशंका फार; कारण त्या बुद्धीला ग्राह्य वाटेनाशा होतात. वर

दिलेली चांभारांच्या उत्पत्तीची हकीकत आधुनिक पद्धतीच्या शोधकांनीं दिलेली आहे; असो. मराठी चांभारांचे अहिर, चेवळी, दाभोळी, घाटी, हरळी, कोंकणी इत्यादि भाग असून त्यांचे एकमेकांशीं विवाहसंबंध होत नाहींत.

त्यांतल्या त्यांत हरळी व दाभोळी हे स्वतःला चेवळी जातीपेक्षां श्रेष्ठ समजतात; कारण चेवळी जात हलक्या जातींचे जोडे नीट करते आणि मुर्दाड मांस खाते. यांच्यापैकींहि कांहीं आडनांवें ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत—भागवत, चव्हाण, देशमुख, देवरे, जाधव, कबाडे, कदम, काळे, पवार, सोनावणे, वाघ, शिंदे, सातपुते इत्यादि. यांचे धार्मिक विधि बहुशः ब्राह्मणच चालवितात. नगराकडे स्मशानविधीला यांना जंगम लोक लागतात.

शेवटीं अस्पृश्यांपैकीं प्रमुख जातीची म्हणजे महारांची हकीकत द्यावयाची. ह्याच्या उत्पत्तीच्या कथा निरनिराळ्या तीनचार आहेत. कोणी महार समजतात कीं, ब्रम्हचाच्या तळव्यापासून स्वरूप सोमाजी महार निघाला त्याची प्रजा म्हणजे अंत्यजाची. कोणी म्हणतात, बेलाच्या पानावरील थेंबाचें पार्वतीनें बालक केलें, त्यानें गाय मारून खाल्ली तेव्हां शिवानें शाप दिला कीं तूं ‘ महार हो. ’ तिसरे कोणी समजतात कीं, सोमाच्या म्हणजे चंद्राच्या डाव्या डोळ्यांतून आपण पडलों. हा चंद्र शिवाच्या मस्तकावर आहे हें सांगणें नकोच. हे सोमवंशी महार झाले. शेवटीं कांहींचें असें मत आहे कीं, गाईनें आपल्या चार मुलांना असें विचारिलें कीं, मी मेल्यें तर तुम्ही काय कराल? पहिले तिघे म्हणाले, आम्ही तुझी पूजा करूं; पण चवथा म्हणाला कीं, मी उपजण्याच्यापूर्वी तूं जसें मला आपल्या पोटांत ठेवलें होतेस तसें मी तुला माझ्या पोटांत ठेवीन, म्हणजे मी तुला मटकावून टाकीन! अर्थात् याचा हा ‘ महा आहार ’

पाहून त्याला महार हें नांव देण्यांत आलें, असें कोणी समजतात. पण ही केवळ शद्बावर कोटी आहे हें उघड उघड दिसतें. कांहीं विद्वानांच्या मतें 'मृताहारी' म्हणजे मुर्दाड मांस खाणारे या शद्बावरून 'महार' शद्ब निघालेला असावा.

असो. अशा या महारांच्या जातींचे बेटीव्यवहाराला बंद असे पन्नासाहून जास्त विभाग आहेत. महार या शब्दालाच निरनिराळ्या कारणांनीं पुढील पर्याय शब्द उत्पन्न झालेले आहेत—अंत्यज, अतिशूद्र, भूमिपुत्र, धरणीचे पूत, भूयाळ, चोखामेळा, धेड, डोंब. ह्रुलसाव, काठीवाले, मेहेतर, मिराशी, परवारी, तराळ, थोरल्या घरचे, वेसकर इत्यादि. भिन्न भिन्न कारणांनीं कांहीं चमत्कारिक पोटजातीहि उत्पन्न झाल्या आहेत—जसे गोपाळ महार म्हणजे महारांतील तापसी; मुरळी महार म्हणजे खंडोबाला सोडलेल्या मुलींची प्रजा; गवशी महार म्हणजे व्यभिचारोत्पन्न महार प्रजा: जोगती महार म्हणजे यल्लम्माच्या भगत प्रजा, इत्यादि. सर्व महाराष्ट्रभर महार लोक पसरलेले असून प्रत्येक जिल्ह्यांतील महारांचे दोनपासून अठरापर्यंत पोटविभाग पडलेले सांपडतात. यांच्यापैकीं कांहीं शेलकीं आडनांवें पुढें दिलीं आहेत—भालेराव, चव्हाण, वाघमारे, वर्तक, यादव, दिवे, गायकवाड, गरुड, जाधव, जोशी, कदम, काळे, लकडे, लोखंडे, मोहिते, मोरे, शिंदे, शिरके, तांबे, इ० लग्नें वगैरे चालविण्यास ब्राह्मण जातो. वैष्णव, शैव, कबीरपंथी, नाथपंथी इत्यादि मतसांप्रदाय असून गुरु, साधू, पंडित, गोसावी, मेंढजोशी इत्यादि यांना धर्म शिकवितात. महारांचे धंदे म्हटले म्हणजे खजिन्याची नेआण करणें, अधिकाऱ्यांची वेठ करणें, कर भरणाऱ्यांना चावडीवर बोलावून आणणें, गांवकुसवाकडे पाहणें, रस्ते झाडणें आणि गांवशिवाराची हद्द ध्यानांत ठेवणें. या सर्व कामांसाठीं अल्पसा मोबदला पैशाच्या रूपानें, व बराचसा जमिनीच्या

रूपानें मिळतो. शिवाय सध्या बऱ्हंशीं बुडालेले पण परंपरेला माहीत असलेले, असे ५२ हक्क महाराला आहेत; पैकीं कांहीं खालीं देतों.

(१) उसाच्या फडाचा भाग (२) वेशीवरचे उतारे (३) होळीवरचा नैवेद्य (४) बेंदराच्या दिवशीं धान्य (५) जनावराचीं कातडीं (६) हात शेकणें म्हणजे गुऱ्हाळाच्या चुलवणाखालीं जाळ घालण्याबद्दल (७) घरटक्का (८) प्रेतासाठीं खड्डे खणण्याबद्दल पैसा (९) खळ्यावरचा दाणा (१०) पेवतळचा दाणा (११) चौरंगावरचे तांदूळ (१२) रखवालीसाठीं वहाणांचा जोड (१३) लग्नाची ओटीदक्षणा (१४) मळणीची ओटी (१५) नवरानवरीची ओंवाळणी (१६) मढेपडे (१७) आषाढीकार्तिकी प्रतिपदेस खेड्याभोंवतीं दोरा गुंडाळण्याबद्दल (१८) रानसोडवण म्हणजे पिकें कापून गंज करतांना कणसें मिळावयाचीं (१९) लगीनटक्का इत्यादि.

वर अस्पृश्यांपैकीं बहुतेकांच्या शास्त्रीय व अशास्त्रीय कल्पना, तसेंच त्यांच्या चालीरीति व धंदे याविषयींची वाचनांत आलेली माहिती थोडक्यांत दिली आहे. ज्यांना ही पसंत अगर कबूल नसेल त्यांनीं ती मानूं नये. चवकशीनें अथवा अभ्यासानें ' खरी ' असेल ती मिळवावी व तिची अधिक विश्वास्यता दाखवावी म्हणजे लोकतीच जास्त मानूं लागतील, हें उघड आहे, असो, या दिलेल्या हकीकतीवरून काय अनुमानें निघतात तें आतां पाहूं.

वर निरनिराळ्या अस्पृश्य जातींतील आडनांवांपैकीं कांहीं नांवें मुद्दामच दिलीं आहेत. त्यांची मनोरंजकता त्यांच्या उपयुक्ततेमुळें भासमान होते. त्या नांवांत कोंकणस्थ, देशस्थ, प्रभु, मराठे इत्यादि श्रेष्ठ जातींतील आडनांवांपैकीं किती तरी आढळतात. हीं नांवें लावणारे अस्पृश्य जर अनार्य तर तीं त्यांनीं कोठून आणिलीं? कांहीं नांवांच्या व्युत्पत्तीवरून तीं त्यांचीं मूळचींच होतीं या अनुमानाला बाध येतो, कारण आर्यांच्या प्राचीन इतिहासांतील कित्येक

नांवांचीं तीं विकृत रूपें आहेत हें इतिहासज्ञांस सांगणें नकोच. मग तीं जर त्यांची मूळचीं नव्हेत तर तीं त्यांनीं विजेत्या आर्यांकडून घेतलीं असावींत असा तर्क आपोआप होतो. आर्यांचा लोट जों जों देशभर पसरूं लागला तों तों द्रविडवंशीय असोत अगर त्यांच्याहि पूर्वींचे असोत, मूळचे लोक हतप्रभ होऊं लागले. वसाहतखोर लोक मूळच्या मालकांना गचांडी देतांना सध्या जसें सर्वत्र दिसून येतें तसेंच तेव्हां झालें असलें पाहिजे. आपल्या गुणांच्या बळावर पहिल्या माणसांकडून त्यांच्या जमिनी या नवीनांनीं हिसकून घेतल्या आणि समतेवर हक्क कधींहि न सांगतील इतक्या बेतानें त्यांना आपल्या पदरीं नोकरीचाकरीस ठेवलें. एकदां धनी असलेल्या पण आतां नोकरीचें दास्य पत्करलेल्या लोकांना लवकरच नामांतर करावें लागलें. जो ज्याच्या शेतवाडीवर नोकरीस राहिला त्याच्याच नांवानें विकूं लागला. वास्तविक पाहतां हें केवळ अनुमान आहे. पण तें करावयास मागील लेखांत महार शब्दास जे पर्याय शब्द दिले आहेत त्यांवरून आधार मिळतो. महारांना ' भूमिपुत्र ' अथवा ' धरणीचे पूत ' अशीं नांवे आहेत, त्यावरून ते स्वतःस या भूमीचे औरस पुत्र समजतात हें उघड आहे. ' मिराशी ' या नांवावरून येथील जमिनीचा मूळ हक्क त्यांचा होता असा बोध होतो. ' थोरल्या घरच ' या नांवावरूनहि पुरातनत्वामुळें या भूमीवर वडीलपणानें मालकी हक्क सांगणारे असा अर्थ सूचित होतो. एतावता काय कीं, त्याच्या जमिनी ओरबाडल्या जाण्याच्या आधीं तो येथील मालक होता. पण मालकाचा चाकर झाल्यावर त्याला नामशेषत्वहि उरलें नाहीं, आणि त्याचें जिणें केवळ उपरें बनून आर्यांच्या कारभारांत कायमचें लोपून गेलें.

आडनांवांवरून केवळ अनुमान काय म्हणून म्हणतां येतें तें पाहिल्यावर त्यांच्या उत्पत्तिकथांवरून काय अनुमानें निघतात तीं पाहूं.

मागील हकीकतीवरून असें दिसून येईल कीं, रामोशाशिवाय इतर सर्व अस्पृश्य आपल्या उत्पत्तीचा संबंध कसा ना कसा तरी शिवाच्या नांवाशीं लावतात. कोणी म्हणतो, आम्ही बिल्वदळांतील थेंबांतून निघालों. दुसरा म्हणतो, शिवाच्या मस्तकावरील चंद्रापासून निघालों. तिसरा म्हणतो, मी शिवाच्या आसपासचाच, पण गोहत्येचा गुन्हा हातून घडला त्यामुळें मांगपणा अगर महारपणा जन्माला लागला; बाकी मी त्याच्या भोंवतालच्यापैकींच. आणखी एकाचें म्हणणें कीं, आम्ही शिवाच्या परम भक्तापासून उत्पन्न झालों. एकंदरीनें काय कीं या सर्व कथांतून आपला संबंध शिवाशीं लावण्याची त्यांची बुद्धि स्पष्ट दृगोचर होते. ही गोष्ट खरोखरच फार आशाजनक आहे. जे लोक शिवाशीं आपला संबंध जडविण्याच्या कामीं इतकी आतुरता दाखवितात ते अति प्राचीन काळीं केवळ शिवालाच आपलें मुख्य दैवत मानीत असतील अशी कल्पना यावरून मनांत येते. आतां आर्यपूर्व काळांत येथील लोकांचे काय व्याप होते; त्यांच्या भाषा, व्यवहार, राज्यपद्धति, उदरभरणाचीं साधनें कशीं होतीं; ते कोणाला देव मानीत; बाहेरून आलेल्या शूर तेजस्वी व रूपसुंदर अशा आर्यांना आपल्यांत समाविष्ट करून घेण्याचा वकूब त्यांच्या अंगीं कांहीं बाबतींत तरी होता कीं नाहीं इत्यादि बाबींसंबंधानें इतिहास निश्चयानें असें कांहींच सांगत नसल्यामुळें या दोन विषम संस्कृतींचा परस्परसान्निध्यांत सख्यसंबंध आणि ऋणानुबंध कितपत झाला यासंबंधानें हमखास असें विधान करणें थोडें धाडसाचें वाटेल. पण विस्मृतीच्या या दाट जंगलाच्या झाडींवर शोधकांनीं जो साधारण का होईना पण उजेड पाडला आहे त्याच्या आश्रयानें आंत जाण्याला पुसट पुसट पाऊलवाटा दिसतात. त्यांवरून जावयाचें म्हटलें तर तत्कालीन अनार्य प्रजेंत शिवाला देवत मानण्याची बुद्धि असावी असें अनुमान करावेंसें वाटतें. ' जसे भक्त तसे त्यांचे देव ' या म्हणीं-

तील स्वारस्य येथें चांगलें प्रत्ययास येऊन लोकांवरून दैवतांविषयीं अनुमान करण्यांत चूक होणार नाहींसें वाटतें. रामायणमहाभारतादि ग्रंथांत या दोन लोकांच्या एकमेकांशीं झालेल्या चकमकींचीं जीं कथांतर्गत वर्णनें आहेत त्यावरून अनार्यांचीं स्वरूपें, त्यांच्या प्रवृत्ति याविषयीं बरींच माहिती मिळते व तीवरून पाहतां भक्त व दैवत यांच्यांतील ताळमेळ अनुमानप्रवर्तक होतो.

शिवाचें ध्यान व परिवार हीं मोठीं बोधक आहेत. त्याच्या गळ्यांत 'नररुंडमाला' आहे आणि त्याच्याभोंवतीं 'भूत-पिशाच्च' इत्यादींचा मेळा आहे. विशाल नेत्र, गोरापान रंग, उंच नाक आणि बुद्धिवैभव इत्यादींनीं युक्त अशा आपल्या रूपाशीं मूळच्या लोकांचीं रूपडीं तोलून पाहून स्वतःला 'नर' शब्दानें व तदित-रांना 'वा-नर' म्हणजे 'कदाचित माणूस' शब्दानें आर्यांनीं संबोधिलें असावें. विजेत्या रूपसंपन्नांनीं जित अशा रूपहीनांना तिरस्कारव्यंजक नांवें द्यावींत हें साहजिक आहे. मग त्या जितांच्या अंगीं कांहीं चांगले गुण असोत वा नसोत. आतां या 'नरां'नीं चोहोंकडे कबजा घेण्याचें काम सुरू केल्यावर प्रत्येक ठिकाणीं त्यांना कापरानें खणण्यासारखी मऊ जमीन सांपडली असेल असें नाहीं. कितीहि असंस्कृत असले तरी या 'भूतपिशाच्चवानरांच्या' अंगीं झगडण्याचें सामर्थ्य असलेंच पाहिजे. आणि म्हणून त्यांनीं आपल्या शत्रूंच्या घोर कत्तली करून विजयोत्साहाचें चिन्ह म्हणून 'नरां'च्या मुंडक्यांची माळ आपल्या दैवताला वाहिली असेल अगर त्यांच्या पुढाऱ्यानें आपल्या गळ्यात बेहोष आनंदाच्या भरांत ती घालून नृत्य केलें असेल. उपऱ्या उपटसुंभांची दाणादाण करणारा असा हा पुढारी त्यांना प्रिय अथवा दैवतसम वाटावा यांत काय नवल? शत्रूंच्या मुंडक्यांचे बुरुज बांधणें आणि त्यांचीं उडविलेलीं डोकीं भाल्यावरून मिरविणें हे आधुनिक इतिहासांतील प्रकार वाचले

म्हणजे तितक्या भूतकाळीं शत्रूंच्या रुंडमाला धारण करण्याची हौस शूरांना असेल यांत शंका नाहीं.

हा प्रकार इतका झाला कीं, नररुंडमाला ही शिवाची निशाणी झाली. त्याचा वेष तर डोंगरी तिरंदाजीला अनुरूप आहे. वाघ, सिंह व हत्ती अशा हिंस्र अथवा धिप्पाड पशूंना सहज गारद करून त्यांची विशाल व उबदार चामडीं म्हणजे ' चर्मे ' त्यानें आपल्या पुष्ट बाहूंवर टाकून दिलीं आहेत. त्याच्या भक्तमंडळाचा म्होरक्या अथवा त्याचा पट्टशिष्य म्हणजे आर्यांचा कट्टा दुष्मन् जो रावण तो होय. त्याचें या भक्तावरील प्रेम पुराणप्रसिद्ध आहे. संतापाच्या भरांत शिवानें आपला लिंगच्छेद करून सरोवरांत दडी मारल्यावर आपल्या दैवताची उरलेली खूण या पराक्रमी भक्तानं जपून ठेवण्यासाठीं आपल्या दक्षिण दिशेकडील घराकडे नेली आणि त्याची पूजा मनोभावें सुरू केली. ही पूजा दक्षिणभागाला सर्वत्र पसरली आणि लिंगपूजा आर्यांनीं अनार्यांपासून घेतली हा तर विद्वानांचा सिद्धांत आहे! युरोपियन वसाहतवाल्यांच्या कदाचित् उघड्या झालेल्या मजेदार तांबूस वर्णाच्या मनगटाकडे पाहून काळ्या रानटी स्त्रिया एकमेकींकडे साश्चर्य पाहूं लागल्या हें वाचलं म्हणजे, दुर्दैवामुळें रानावनांत भटकावें लागलेल्या भीमाचें आणि रामाचें तें नयनमनोहर आणि शिवाय राजतेजानें झळकणारें रूप पाहून हिडिंबा आणि शूर्पणखा या रानटी स्त्रियांना अभिलाषबुद्धि उत्पन्न व्हावी हें साहजिक दिसतें. पण अनार्य स्त्रियांना जसा आर्य पुरुषांचा तसा अनार्य पुरुषांना आर्य स्त्रियांचा मोह पडत असला पाहिजे. दुर्बलांना केवळ इच्छा करण्यापलीकडे कांहींच करतां येत नसेल; पण रावणासारखे जे जाडे पराक्रमी त्यांनीं ठिकठिकाणच्या सुंदर स्त्रिया आपल्या अंतःपुरांत सामील केल्या. हें रावणासारख्या धटिंगण भक्ताला सहजच शोभलें. पण शिव हा भक्तापेक्षां अधिक

गुणाढ्य असेल आणि हिमालयांच्या आसपासच्या वस्तीनें गौरवर्णहि असेल. त्याला हिमालयांतील आर्य दक्षाची कन्या पार्वती भाळली. शिव असेल गुणी, विभविशोभित; पण म्हणून आर्य दक्षाला हें कसें आवडावें! हाबसाणाचा राजा उत्तरेकडे राहून कांहीं उजळला म्हणून त्याला भाळलेली आपली पोर जर्मन सम्राट् काय जवळ करील? दक्षानें पार्वतीला माहेरसुद्धां दूर केलें. लग्नकार्यांतसुद्धां तो तिला मूळ धाडीना, जामातांना निमंत्रण तर दूरच राहिलें. फुणकारा लागलेल्या स्वाभिमानानें शिव वेडावून गेला आणि त्यानें दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस केला. अनार्य लोकांनीं आर्यांच्या यज्ञावर नजर राखून त्यांचा विध्वंस केल्याच्या तक्रारीं ब्राह्मणांनीं आपल्या राजकडे नेल्याच्या कथा पुराणभर पसरल्या आहेत. यज्ञविध्वंस ही खणखणित खूण शिवस्वरूप यथार्थ दाखविते. शिवाचे मुख्य शत्रु म्हणजे काम आणि क्रोध. भक्तराजाच्या ठिकाणीं त्याच गोष्टींचें वास्तव्य. क्रोध असा अनावर कीं, एकदां सेवा चुकली कीं अरिष्ट ओढवावयाचें! आणि कामाविषयीं तर लिहावयासच नको. शेवटीं चिक्कू बापाचा मुलगा उधळ्या निघावा त्याप्रमाणें बापाचा हा कैफी लंपटपणा पाहून वडील मुलानें शिसारी खाल्ली आणि 'मला जी स्त्री पाहील ती सप्तजन्मीं विधवा होईल' असा शाप उच्चारून तो भुईआड तोंड करून राहिला! वरील प्रवृत्तीचा इतका गडद रंग मनाला असणें हें मनाच्या उंचीचें मापक असतें. अनार्यांनीं आपला देव असाच रंगविला.

पण हें कसेंहि असलें तरी शिव म्हणजे 'नरां'ना मोठ्या वचकांत ठेवणारा अनार्यपक्षपाती होता यांत शंका नाहीं. दोन प्रकारचे लोक शेजारीं शेजारीं आल्यावर आणि कोणीच कायमचा नष्ट होण्यासारखा नाहीं हें ठरल्यावर पहिल्या वैरभावाचा जोर नरम पडू लागला; आणि एकमेकांशिवाय गत्यंतर नाहीं असें राष्ट्रीय संसारांत

दिसूं लागलें. अर्थात् देवघेवीशिवाय शेजारधर्म कधींहि संभवत नसल्यामुळें ती सुरू झाली, सामान्य लोकांनीं लिंगपूजा कालेंकरून पतकरली आणि वेदांतील रुद्रकल्पना शिवाशीं संलग्न करण्यांत आली. ही देवघेव इतकी झाली कीं, शिव मोठा कीं विष्णु मोठा असेंहि तंडण सुरू झालें! पण सर्व उदात्त कल्पना एकं ठिकाणींच भेटतात ही अत्यंत विशाल तत्वभावना रूढ होऊन तोही तंटा मिटला. पण इतकें झालें तरी शिवाची संहारबुद्धि नरांच्या मनांत रुतून बसली होती तीमुळें शेवटीं प्रळयाचें आणि संहारकांचें काम त्रयींपैकीं महेशाकडेच राहिलें. शिवालाहि आर्यकुलोद्भव रामचंद्राच्या चरितानें शांति प्राप्त झाली आणि लोकांनींहि शिवस्वरूप सर्वत्र पूजनीय मानलें, तें इतकें कीं आज अवघ्या भरतखंडांत यात्रेचें आदिस्थान जी काशी त्या ठिकाणीं शिवाचें लिंग आहे. उंच उंच टेकड्यांवर शिवाचीं लिंगें स्थापन करून हिंदु लोक त्यांची पूजा आज सहस्रावधि वर्षें करीत आहेत. सर्व पुराणकथांचा आणि तत्सम वाङ्मयाचा निर्झर शिवाच्या निर्मल वागींतून उमटला आहे. आणि औदार्य, धीरोदात्तता, गांभीर्य, ऋजुता इत्यादि गुणांचें निवासस्थान म्हणून त्याची आराधना सर्वत्र होत आहे. अनार्यांच्या देवतेचा आर्यांवर हा केवढा विजय! उभय लोकांच्या धार्मिक कल्पनांच्या दोरकाचा ग्रंथी म्हणजेच हें शिवलिंग होय. बाहेरच्या जड संसारांत ज्याप्रमाणें, त्याप्रमाणेंच या अदृश्य आणि केवळ कल्पनागम्य मुलखांत आर्यांनीं आणि अनार्यांनीं हातांत हात घातले व शेजारधर्म कायमचा पतकरला. आपण हिंदु लोक धर्मकल्पनांत अथवा देवताकल्पनांत अत्याग्रहखोर नाहीं. आपल्या अंगीं संग्रहक्षमता फार आहे. भूतकालाकडे तोंड करून कालाची ही विशाल नदी पाहिली म्हणजे तिला शेकडों वाकणें दिसतात. पिराची पूजा घेतली, राम रहिम एक असा उपदेश केला, बुद्धाला अवतार

ठरविलें, आहिंसा घरांत घेतली, नागपूजा स्वीकारली, लिंगपूजा मानली असे परत जातां जातां वर सांगितलेल्या विस्मृतीच्या अरण्यांत काल्नदीच्या कांठीं शिवमंदिरांत त्याच्याच साक्षानें आर्य व अनार्य यांची दिलजमाई होतांना दिसलीं. हरिभक्तांनीं या लोकांना वर ओढले. त्याच्या आधीं रामानुजासारख्यांनीं देवळाचीं द्वारें त्यांना खुलीं केलीं, व त्याहि मागें शिवपूजा उभयतांनीं मानून एकीचें बीज घातलें; असा हा अत्यंत मंगल प्रसंग आहे. तो मनांत कल्पून त्यावर वाङ्मयाचा मोहोर कितीहि वाहिला तरी पुरा पडणार नाहीं असें त्याचें महत्व आहे.

उभय लोकांना समानाधिष्ठान काय असेल तें शोधावें हें माझें मनोगत चाणाक्षांना सहज दिसण्यासारखें आहे. या बाबतींत रा. चिंतामणराव वैद्यांच्या उपसंहारांतील १२ व्या प्रकरणांपैकीं शिव व विष्णु हा भाग अवश्य वाचावा. आम्ही त्यांचा शिव घेतला व आमचा विष्णु—विठु विठोबा त्यांना, अर्धवट का होइना, दिला अशी ही देवघेव आहे.

आतां उरल्यासुरल्या शंका—कुशंकांना उत्तरें देऊन उपसंहारभूत चार विचार लिहून आटपतें घेतों.

पुष्कळांना असें वाटतें की, ‘ हें अस्पृश्यतानिवारणाचें खकटें आपण होऊन तुम्ही कां पिकवीत बसता ? ’ याला दोन उत्तरें आहेत. एक—केवळ आम्ही पिकवितों हें खोटें आहे. पिकविलें असतें तरी वहावेचेंच काम झालें असतें; पण खुद्द अस्पृश्यांना आपली हीन स्थिति कळत नाहीं असें आक्षेपकांना वाटतें काय ? स्वतः ते ओरडत उठलेच आहेत. दुसरें असें कीं, ते उठत नसले आणि आम्ही आहों तेच बरे आहों असें जरी त्यांना वाटत आहेसें मानलें तरीसुद्धां आम्ही त्यांना आपण होऊन उठविलें पाहिजे. कारण असलें मनोदौर्बल्य राष्ट्राच्या नवीकरणाच्या आड येईल. त्यांना

स्वाभिमान शिकविलाच पाहिजे. पुष्कळ गांव-पुढाऱ्यांच्या पुढें या विषयाचा पाढा वाचला म्हणजे ते उद्गारतात, 'खरें आहे, पण समाज तयार नाहीं.' समाजाच्या बिनतयारीवर सगळा डाव कोलवून देणें मोठें सोयीचें असतें. पण त्यांनीं इतकेंच ध्यानांत ध्यावें कीं, हा मुद्दा राजकीय चळवळीच्या वेळीं आपण पुढें आणतों का, आणि एखाद्यानें आणला तर त्याची संभावना आपण कशी काय करतों? तयारी नाहीं असा वहीम असला तर आपण तयारीच्या मागें लागतों. तसेंच येथें. आपल्याला 'खरें आहे' असें वाटत असल्यास समाजाला ती शिकवण सुरू करावी. नाहीं तर समाजानें म्हणावें, पुढारी बोलत नाहींत आणि पुढाऱ्यांनीं म्हणावें, समाज तयार नाहीं. म्हणजे या चक्रांतून सुटावयासच नको. कोणी म्हणतात 'हे लोक मोठे घाणेरडे असतात. जवळ कसे करावेत!' येथेंहि वरचेंच चक्र लागू आहे. दूर ठेवले म्हणून घाणेर का घाणेरे म्हणून दूर ठेवलें? जरा चार माणसांत घ्या आणे मग बघा तसेच घाणेरडे राहतात का? ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे कीं, त्यांच्यांतील प्रतिष्ठित माणसें चांगल्या संगतींत खात्रीनें अधिक स्वच्छ होतात. कोणाची अशी तक्रार आहे कीं, हे लोक, म्हणजे त्यांच्यांतले बोलके, भारी शिव्या देतात. होय, हें खरें आहे. पण असें ध्यानांत घ्यावयास पाहिजे कीं, त्यांच्या स्थितींत आपण असतों तर कसें काय केलें असतें? चाकावर बांधलें जाऊन फटके बसत असलेल्या एका कैद्याचें किंचाळणें ऐकून शेजारी उभे राहिलेले एक सतारमास्तर म्हणाले, 'बाबा, तुझे हाल कबूल आहेत. पण तुझें किंचाळणें मोठें कर्कश लागतें' तसाच हा प्रकार आहे. असें वाटतें कीं, हालांतून काढण्याच्या कामाला आपण लागलों तर त्यांच्या शिव्या बंद होतील, कारण त्यांना तितपत कळतें, निदान कळावें. असो. कोणा तात्विकांचा युक्तिवाद असा आहे कीं, यांना राष्ट्रीय चळ-

बळींत गोवून टाकावेत म्हणजे अस्पृश्यतेचा प्रश्न आपोआपच सुटेल. या कोटीवर मागें एके ठिकाणीं उत्तर आलें आहे, पण नवीन हवेंच असेल तर बर्कच्या शब्दांनी अस्पृश्याला असें म्हणतां येईल कीं, आमच्या मनांत जर देशप्रीति उत्पन्न करावयाचें असेल तर आमचा देश अगोदर प्रीतियोग्य झाला पाहिजे. स्वदेशप्रेम उत्पन्न होण्यासारखी स्थिति अस्पृश्यांच्या बाबतींत अजून नाहीं, ही गोष्ट नाकारतां येणार नाहीं. त्यांच्या दैन्याचें वर्णन केलें म्हणजे कोणी म्हणतात कीं, कित्येक वरिष्ठ लोकांपेक्षां त्यांची सांपत्तिक स्थिति चांगली आहे. असें असेल तर ' इतपत चांगल्या माणसांना सुद्धां दूर ठेवणें सामाजिक दृष्टया परवडतें ना ' असें परत विचारतां येण्यासारखें आहे. कोणी कोणी त्यांना ' साहेबाच्या बशा चाटणारे ' म्हणून हेटाळतात. हें तर जखमेंत मीठ भरण्यासारखें निर्दयपणाचें आहे. पोट प्रत्येकाला आहे, आणि त्याची खळगी भरण्यासाठीं जिवाची काय कुतरओढ होत आहे ती वरील आक्षेपकाच्या वांटणीला आली नाहीं असें दिसतें. ' हे लोक सरकारशीं मिसळतात ' म्हणून कोणाचा घुस्सा आहे. याला उत्तम तोडगा म्हणजे त्यांना आपल्यांत घेणें येवढाच आहे. ' ते अमुक एक प्रकारच्या पिसाटांचीं भाषणें चविष्टपणानें ऐकतात ' असाहि आरोप आहे. यावर इतकेंच म्हणतां येईल कीं, तुमचीहि भाषणें त्यांना ऐकवा, ते माणसांतून उठलेले नाहींत, सद्विचार कानीं पडल्यास त्यांना ते आवडत नाहीं असें मानणें चूक आहे, त्यांची आणि तुमची कधींच गांठ पडत नाहीं. अर्थात् ज्यांची पडते त्यांचें ते ऐकतात. मी तुझ्याशीं बोलणार नाहीं आणि तुझ्याशीं कोणी बोलला तर मला कसेंसें वाटेल असें म्हणून कसें चालेल ? तात्पर्य काय कीं, अशी उडवाउडव करून चालावयाचें नाहीं. ज्याला

ज्याला राष्ट्रहिताची आणि धर्मकल्पनेची जाणीव असेल त्यानें जबाबदारीनें या प्रश्नाचा विचार करावा आणि अस्पृश्यता काढावी.

अस्पृश्यांना आमच्या धर्मांत खसखशीतपणें अंतर्भूत केलें पाहिजे. डॉ. कुर्तकोटी यांनीं गेल्या दोन हिंदुधर्मपरिषदांत जें यश संपादिलें आहे तें उमेदकारक आहे. ठराव पास झाले. पण आतां पुढील विनंति ही कीं, या ठरावाला अनुरूप उपदेश करणारे प्रचारक श्रींनीं चोहोंकडे धाडले पाहिजेत. हक्क दिल्याच्या गौरवांत परिस्थितीचा पेंच ओळखल्याचें श्रेय आहे, पण त्याप्रमाणें घडवून आणण्यासाठीं आपण होऊन यत्न केल्यानें ती गोष्ट धर्मासाठीं मनापासून पाहिजे असा अर्थ होईल. ‘तुम्ही जन्मानें नीच आहांत’ हा उपदेश बंद करण्याचें आज्ञापत्र श्रींनीं काढलें पाहिजे. या सर्व कामांतील अवघडपणा माहीत असूनसुद्धां श्रींच्या कर्तबगारीकडे पाहून तें त्यांजपुढें मांडावेंसें वाटतें. तसेंच भागवत–धर्मियांनीं आपलीं कोंडाळीं फ़ोडलीं पाहिजेत, व खरोखरीची धार्मिक उदारबुद्धि दाखविली पाहिजे. या बाबतींत त्यांच्याइतका अधिकार आज दुसऱ्या कोणालाहि नाहीं. औदार्यांत भागवतांच्यावर सरशी आजपर्यंत कोणीं केली आहे? शैवांनीं एक सुप्रसिद्ध शिवाचें देवालय व भागवतांनीं पंढरीचें देवालय कायम करून तेथें या लोकांना दर्शनासाठीं तरी आज आंत घ्यावें. ऐक्यवर्धनाला या ठिकाणासारखी अत्यंत पवित्र जागा दुसरी कोणती कल्पितां येईल? निराळीं देवळें बांधावयाची कल्पना पुष्कळ दिवसांची आहे, पण त्रैवर्णिकांच्या धर्मबुद्धीवर अजून इतपत विश्वास आहे कीं, ते अजून औदार्य स्वीकारतील. असें वाटतें. नुसत्या शंकराचार्यांच्या आज्ञापत्राला कोण विचारतो? हें युग एकानें बोलून सगळ्यांनीं ऐकावयाचें असें नाहीं. सगळ्यांनीं बोलावयाचें आहे. सर्वांनीं पाठिंबा दिला तर आचार्यांचें काम सुकर होईल. निराळें देवालय बांधणें म्हणजे त्रैवर्णिकांच्या हट्टाचें स्मारकच

होणार ! म्हणून पुन: त्यांच्या धर्मबुद्धीला भीड घालावीशी वाटते. आधींच धर्म पुरेसा विदीर्ण झालेला नाहीं काय कीं त्याची आणखी ओढाओढ करावी ? इतक्यानेंहि भागेना तर मग बारा वाटा मोकळ्या आहेतच; जें झेपेल तें करण्यांत येईल. 'देऊळ, धर्म' असे शब्द बोलले म्हणजे सुशिक्षित, उघड किंवा झांकून, तिरस्कारानें हंसतो. पण असल्या लोकांचा एक अगदीं पातळ पापुद्रा आहे. खरा विराट समाज पंढरपूर, आळंदी अशा ठिकाणीं जमतो. तेथील अधिकाऱ्यांनीं हा प्रश्न सोडविला म्हणजे समाजानें सोडविला असा अर्थ होईल. सुशिक्षित काय बेफिकीर आहे. महार देवळांत आला काय किंवा न आला काय तो ही गोष्ट तितपतच मानतो, म्हणून ज्यांना त्या स्थलाचें महत्त्व आहे त्यांनीं हा प्रश्न सोडविला म्हणजे तो सुटला असा अर्थ होईल.

अस्पृश्यांना इतकेंच सांगावयाचें कीं, समाजापासून आधींच असलेलें अंतर ज्या ज्या कृत्यांनीं जास्त होईल तीं तीं होतां होईतों त्यांच्या हातून न झालेलीं बरीं. इतर कोणत्याहि आश्रयाच्या अभावीं त्यांनीं सरकारच्या पदरीं जाऊन पडावें हें अगदीं साहजिक आहे. पण तेथें असतांना सुद्धां आपल्याला स्वत:च्या समाजांतच चिरकाल नांदावयाचें आहे हें त्यांनीं विसरतां उपयोगीं नाहीं साहेब काय आज आहे उद्यां नाहीं; या काळाच्या उलथापालथींत असा प्रकार केव्हांना केव्हां ठेवलेलाच आहे. तसेंच स्वराज्यार्थ होत असलेल्या झगड्याचा फायदा त्यांना निश्चयानें होणार आहे. त्यांनीं जागरूकता मात्र अखंड ठेवली पाहिजे. अस्पृश्यांचें हितच जर सरकारास साधावयाचें असतें तर निदान चांभारांना आणि मांगांना त्याच्या विद्या आधुनिक पद्धतीनें शिकवून परदेशी जात असलेला कोट्यवधि खजिना त्यांच्या घरांत घालतां आला असता. पण तो सर्व पैसा युरोपीय मांगा-

चांभारांच्या घरीं जात आहे. असो. देवळांत जबरदस्तीनें शिरण्याचा मोह त्यांनीं आवरला पाहिजे. येथें कांहीं शक्तीचें प्रदर्शन नाहीं. जबरीनें गेलांत तर तें स्थल अपवित्र झालेसें समजून इतर लोक तेथें जाण्याचें बंद करतील, किंवा तुम्हाला बाहेर काढून पुनः शुद्धि-संस्करणें करतील; म्हणजे काय कीं, तुम्ही पुनः दूरच्या दूरच. पण 'आम्हांला आंत घ्या' हा लकडा मात्र निकडीनें लवतां येईल तितका लावावा. कारण ही मागणीच अशी आहे कीं, न देणारा मनच्या मनांत सारखा ओशाळा राहील. अस्पृश्यांचीं नांवें शिवी-वाचक झालीं आहेत. तीं त्या अर्थानें समाजानें अतःपर उपयोजूं नयेत. पण अस्पृश्यांनींही आपल्या सत्प्रवृत्तीनें व गोड वाणीनें समाजाच्या या प्रयत्नाला मदत केली पाहिजे. एखाद्याला अमुक एक गोष्ट तूं कर म्हणून पुनः पुनः सांगितलें तर कार्यांतीचें उदात्तपणा आव्हान त्याच्या उदार भावनांना पोंचून तो तें कार्य करूं लागेल; पण हें जसें एक प्रेरक कारण होतें तसें तूं न करशील तर पेंचांत सांपडशील' असें त्याला पटवून देणें हेंहि एक दुसरें कारण होतें. अस्पृश्यतरांना एक पेंच पडणार आहे. यापुढें सगळें राज्य संख्येवर रचलें जाणार आहे. ज्या ज्या मानानें संख्येचें बळ एखाद्या समाजाचें जास्त त्या त्या मानानें राज्यशकट हांकण्यत्चा अधिकार त्याला जास्त असें होणार आहे. या दृष्टीनें वाचकांनीं एकंदर जातीच्या संख्येचे आंकडे नीट ध्यानांत घ्यावें. आपल्या प्रांताला ३२॥। लक्ष मराठा आहे, २४॥। लक्ष कुणबी, २० लक्ष कोळी, १४॥। लक्ष महार ३ लक्षांवर चांभार, २॥। लक्ष मांग. १८४ हजार बेरड, १०२ हजार वडार, ९३ हजार भंगी, ९१ हजार कातकरी अशी प्रजा आहे. नुसता धनगर जवळपास ८॥ लक्ष आहे. ब्राह्मण १०६७ हजार असून कोंकणस्थ अवघा ११० हजार आहे! पारशांपेक्षां कातकरी जास्त आणि रामोशी सारस्वतांपेक्षां थोड्याशा हजारानीं

कमी. कोंकणस्थांना राज्यसूत्रें कित्येक वर्षें ज्या कारणांनीं चालवितां आली त्याच कारणांनीं साहेब राज्य करतो. प्रजा अजाण आहे. त्या सर्वांना उठविलें पाहिजे. हा भिन्न भिन्न लोकांचा रगाडा एकराष्ट्र कसा करतां येईल ? प्रस्तुत फक्त अस्पृश्यांवरच दृष्टि ठेवून विचार कर्तव्य आहे. लोकांचें एकीकरण, भौगोलिक हितैक्य, संस्कृतीचा समानपणा, रक्तसंबंध, आणि परस्परावलंबन यांनीं संभवतें. अस्पृश्यांशीं स्पृश्यांचें भौगोलिक हितैक्य आहे. हिंदुस्थानांत फार जाति आहेत; पण त्यांची वांटणी, ऑस्ट्रियांतल्या भिन्न भिन्न जातींच्या वांटणीप्रमाणें प्रांतवार न होतां, म्हणजे आसामांत सगळे ब्राह्मण, मद्रासेकडे सगळे धेड, अशी न होतां, प्रत्येक गांवांत हरजातीचे लोक आहेत असें दिसेल. त्या सर्वांचा मिळून एक गांव होत असल्याकारणानें अगदीं शेवटपर्यंत वस्तीच्या दृष्टीनें हितैक्य आहेसें दिसेल. ही आशेला जागा आहे. सांस्कृतिक दृष्टया पाहतां, भाषा बहुंशीं एक आहे, वाङ्मय कांहींसें त्यांनीं उचललें आहे. पूर्वपीठिका मात्र त्यांच्या आपल्या एक नाहींत. पण त्यांचा अंतर्भाव समाजाच्या जुळणींत सांपत्तिक दृष्टया झालेला असून, धर्मांत भागवत संप्रदाय ही सामान्य भूमिका उभयतांना आहे. रक्तसंबंधानें एकी होणें संभवनीय नाहीं. शेवटीं परस्परावलंबनानें घडणारी एकी शिल्लक उरते. ही संवय आधींपासून आहे. रक्तसंबंधाची एकी जर संभवत नाहीं तर शेवटच्या इलाजाचा अवलंब जोरानें केला पाहिजे. आम्ही तुम्हाला हवे आहोंत, तुम्ही आम्हांला हवे आहांत हा भाव बळाला लावला पाहिजे. सुशिक्षितांनीं अस्पृश्यांच्या हरतऱ्हेनें उपयोगी पडावें. नवीन गोष्ट सुरू करावयाची म्हटली म्हणजे आपण क्षुद्र लोकांसारखे म्हणजे असंस्कृतांसारखे करूं लागतों. परकीयांनीं सांगितलेलीं साधनें उचलतों. तसें न करतां गंजलेलीं हत्यारें पाजळावींत व अस्पृश्यांना शिक्षण द्यावें. नुसत्या साक्षरतेवर थांबू

नये. सद्विचार ऐकवावा व चांगल्या वाचनाची गोडी लावावी दुसरें, युरोपियन संस्कृतीचा उडालेला बोजवारा झाडून सर्व प्रजांच्या कानीं घालावा. पण यांत देशाभिमानाचें वेडें वारें नसावें. अभ्यास आणि निश्चितपणा असावा. तिसरें, त्यांच्या स्वभावाचें दैन्य काढावें. तूं जन्मानें नीच आहेस असें सांगूं नये. त्यानें माणूस दिनावतें, मान ताठर करून वर पाहूं शकत नाहीं. साहेबांचें दास्य करणाराचा तो दास बनतो, मग परक्यापुढें स्वाभिमानानें मान तो कशी उंचावील? आपलें धर्मज्ञान त्याला द्यावें, आपल्या संस्कृतींत त्याला मिसळून घेऊन तिचा अभिमानी म्हणून रक्षिता बनवावा. ज्याला गमविण्यासारखें कांहींच नसतें तो पुष्कळदां नवीन मतांना लवकर वश होतो. विपरीत मतें परद्वीपांत चालू आहेत इकडे काळजीपूर्वक लक्ष पाहिजे. चौथें, धंद्याचा बोज वाढवावा. त्याला इतर सर्व बाबतींत मोठेपणा इतरांइतका दिला तर त्यानें धंद्याची लाज बाळगूं नये. मग तुम्ही त्यांना त्याच घाणेरड्या धंद्यांत ठेवूं इच्छितां असा आपल्यावर कारण नसतां आरोप येईल, अशी सूचना या ठिकाणीं आपलगाला यश चिंतणारा करील हें खरें आहे. पण भीति वाटते ती ही कीं, चढाओढीची झटापट सुरू झाली म्हणजे अधिक बुद्धिवान जाति व पैकेवाले अन्य जातीय, या माणसांनीं अर्धवट टाकलेले धंद भराभर पकडतील आणि हीं बापडीं मिळती भाकरीं गमावतील. ज्या महारेत्यादीनां जुना कोणताच धंदा उरला नाहीं, त्यांनीं अर्थात् वाटेल तें करावें. असो. क्षत्रिय व ब्राह्मण कितीहि भांडले तरी पूर्वसंस्कृतीचे पाये उभयतांनीं भरले असल्यामुळें रद्दी होईल म्हणून याहि बाबतींत अस्पृश्यांचा नवीन इतिहास व त्यांचें नवीन मन्वंतर सुरू होतांना स्पृश्यांनीं त्यांना स्वकीय करून घेण्यासाठीं त्यांच्याशीं आपलीं नावें सलग्न करून घ्यावींत. त्यांना आतुरता उत्पन्न झाली आहे. थोडी असली तर लवकरच फार होईल. या

आतुरतेच्या प्रसंगीं जो उपयोगी पडेल तो प्रेमाचा विषय होईल. हें उघड आहे. शेवटीं, तो महद्भाग्याचा प्रसंग केव्हांही अवतरो, त्यांना श्रीविठ्ठलस्वरूप दाखवावें व हा हिंदुस्थानचा राष्ट्रपुरुष सर्व सामर्थ्यानिशीं उभा करावा."

माहिती पूर्ण व्हावी म्हणून या लोकांच्या वस्तीचे जिल्हावार आंकडे व इतर प्रमुख जातीचे आंकडे पुढें एकत्र दिले आहेत. आंकड्यावरून तौलनिक ज्ञान होऊन विषयाचें खरें महत्व ध्यानांत भरेल. ज्या वाचकांनीं हा लेख वाचण्याचा अनुग्रह मजवर केला असेल त्यांचे स्वतःवर व अस्पृश्यांवर सुद्धां फारच उपकार झाले आहेत. माझीं कांहीं विधानें चुकीचीं व अनुमानें धाडसाचीं असण्याचा पूर्ण संभव आहे. तोल संभाळण्याचा यत्न करून सुद्धां तो न राहिला असण्याचाही संभव आहे; कारण बोलूनचालून माझा ओढा अस्पृश्याकडचा आहे. विद्वानांनीं आणि विचारवंतांनीं या विषयांत लक्ष घातलें असतें तर मला माझें अज्ञान व विचाराचा कोतेपणा समाजापुढें पसरून मांडण्याचा प्रसंग चुकवितां आला असता. पण माझें म्हणणं ठोकूनठोकून नीट करण्याचा यत्न आतां कोणी ज्ञानी माणसांनीं केला तर खऱ्या ज्ञानी विचारवंतांना बोलावयास लावल्याचें श्रेय मला लाभेल.

---